# ज्ञानेश्वरांच्या गोष्टी

लेखिका

**प्रियंवदा करंडे**

**किंमत २० रुपये**

जय हिंद प्रकाशन

**रायकर ब्रदर्स पब्लिशिंग हाऊस प्रा. लि.**

२१२, क्रिएटीव्ह इंडस्ट्रीयल सेंटर, ना. म. जोशी मार्ग,
लोअर परेल (पूर्व), मुंबई - ४०० ०११.
दूरध्वनी : २३०७ ५८९९, २३०७ ५८६७

**नवीन आवृत्ती : फेब्रुवारी २०१३**

**प्रकाशक**
रायकर ब्रदर्स पब्लिशिंग हाऊस प्रा. लि.,
२१२, क्रिएटीव्ह, इंडस्ट्रीयल सेंटर,
ना.म. जोशी मार्ग, लोअर परेल,
मुंबई - ४०० ०११.
दूरध्वनी : २३०७ ५८९९ २३०७ ५८७६

**मुद्रक**
**मुद्रण आविष्कार,**
१९४–एम्, कात्रक कंपाऊंड,
गायवाडी, गिरगांव, मुंबई–४०० ००४.

**लेझरजुळणी :**
अक्षय फोटोटाईपसेटर्स,
कुलदीपक, सुभाष पथ,
ठाणे - ४०० ६०१.

# ज्ञानेश्वरांच्या गोष्टी

पैठणपासून चार कोसांवर गोदावरी नदीच्या उत्तरतीरावर आपेगांव नावाचे गांव आहे. या गांवी विठ्ठलपंत नावाचे एक गृहस्थ राहात होते. विठ्ठलपंत लहानपणापासूनच ईश्वराची भक्ती करीत. त्यांनी वेदांचा अभ्यास केला होता. तो अभ्यास पूर्ण झाल्यावर त्यांनी तीर्थयात्रा करावयाचे ठरवले. द्वारका, भालुकातीर्थ, त्र्यंबकेश्वर अशी यात्रा करीत ते आळंदीला आले. आळंदीला ते श्रीसिद्धेश्वराच्या देवळात उतरले. विठ्ठलाचे भजन करावे, चिंतन करावे आणि शास्त्रांचा अभ्यास करावा असा विठ्ठलपंतांचा दिनक्रम होता. आळंदीचे कुळकर्णी होते सिधोपंत नावाचे एक सद्गृहस्थ! ते सदाचारी आणि ज्ञानी होते. त्यांच्या बायकोचे नाव होते उमा! तीही धार्मिक वृत्तीची बाई होती. त्यांना एक मुलगी होती. तिचं नाव होते मीनाक्षी! ती गुणी होती, सुशील होती. सिधोपंत आपल्या मुलीसाठी वर शोधीत होते. आपल्या सद्गुणी लेकीला नवराही ज्ञानी, सदाचारी आणि परमेश्वरावर श्रद्धा असणारा असाच हवा अशी त्यांची इच्छा होती. विठ्ठलपंतांचे तेजस्वी रूप आणि त्यांची विद्वत्ता पाहून सिधोपंत मनोमन खूष झाले. त्यांनी आपल्या मुलीचे-मीनाक्षीचे लग्न विठ्ठलपंतांशी करण्याचे ठरवले. ते श्रीसिद्धेश्वराच्या देवळात गेले, आणि विठ्ठलपंतांना म्हणाले,

''विठ्ठलपंत, तुम्ही इथे देवळात एकटे का राहाता? त्यापेक्षा आमच्या घरी या. आमचा पाहुणचार स्वीकारा. तुमच्यासारख्या ज्ञानी पुरुषाचा सहवास आम्हाला मिळाला तर आम्हाला फार आनंद होईल. मग याल ना आमच्या घरी मुक्कामाला?'' सिधोपंतांचे ते

आर्जवी बोलणे ऐकून विठ्ठलपंत खूष झाले. सिधोपंतांना विठ्ठलपंत कसे वागतात हे पाहायचे हाते, त्यांची परीक्षा घ्यायची होती. म्हणून त्यांनी विठ्ठलपंतांना घरी बोलावले. सिधोपंतांच्या विनंतीला मान देऊन विठ्ठलपंत त्यांच्या घरी मुक्कामाला गेले. सिधोपंत उमाबाईला म्हणाले, ''अहो पाहिलंत का? कोणं आलं ते? विठ्ठलपंत आले आहेत म्हटलं!'' उमाबाई तुळशीपाशी निरांजन ठेवीत होत्या. निरांजनाच्या प्रकाशात त्यांचा सुंदर चेहरा जास्तच उजळला होता. त्यांनी चमकून पाहिलं. ''अगबाई, विठ्ठलपंत का? यावं यावं! असं पुटपुटत आणि डोक्यावरचा लुगड्याचा पदर सावरत त्या लगबगीने देवघरात गेल्या. मीनाक्षी तिथेच देवाचं नाव घेत बसली होती, तिला म्हणाल्या, ''मीनाक्षी, अग, विठ्ठलपंत आले आहेत. चल, त्यांना ऊनऊन पाणी देऊ. भाकरी करू. तोंडी लावायला चटणी करू. ऊठ बाई!'' उमाबाईच्या आवाजात जावयाबद्दलचा अभिमान दाटून आला होता.

अशा रीतीने विठ्ठलपंत येऊन पंधरा दिवस उलटले. ते दिवस कसे गेले ते सिधोपंतांना कळलच नाही इतके ते जावयाच्या तैनातीत मग्न होते. एके दिवशी ते विठ्ठलपंतांना म्हणाले, ''विठ्ठलपंत, मग आमची मीनाक्षी तुम्हाला पसंत आहे ना? तुम्ही तिच्याशी लग्न करावं अशी आमची इच्छा आहे.'' ''अहो, पण माझे आईवडील तर आपेगावी आहेत. शिवाय मी तीर्थयात्रेला जायला निघालो आहे. साधुसंतांच्या भेटी घ्यायला निघालो आहे.'' ''मग त्यांत काय झालं? लग्नानंतरही तीर्थयात्रा करता येईल. आता ज्येष्ठातला शेवटचाच मुहूर्त आहे. तो तरी साधला पाहिजे, हो ना?'' सिधोपंतांनी विचारलं. शेवटी विठ्ठलपंत लग्नाला तयार झाले. मीनाक्षीचे नांव त्यांनी ठेवले 'रुक्मिणी'. सिधोपंतांना अगदी धन्य धन्य झाले. मनासारखा जावई मिळाला म्हणून उमाबाईंच्या

डोळ्यात आनंदाश्रू आले. तिने मीठमोहऱ्या घेऊन तरुण जोडप्याची दृष्ट काढली. अशा रीतीने सासूसासऱ्यांचा निरोप घेऊन विठ्ठलपंत रुक्मिणीला घेऊन रामेश्वरापर्यंत उरलेली यात्रा करायला गेले.

## मायलेकरांची भेट

यात्रा आटोपून ते आपेगांवी आपल्या घरी आले. खूप दिवसांनी आपला लाडका मुलगा परत आला म्हणून त्यांच्या आईवडिलांना अपार आनंद झाला. ''विठ्ठला, अरे किती दिवसांनी भेटतो आहेस? आणि... आणि ही कोण रे?'' रुक्मिणीकडे पाहात त्यांच्या आईने विचारले. ''आई, बाबा, ही तुमची सून! रुक्मिणी! सिधोपंतांची मुलगी! आळंदीला 'कुळकर्णीपण' पाहातात ते!'' विठ्ठलपंतांची सांगितलं. लाजरी बुजरी, चंद्राच्या कोरीसारखी नाजुक, रेखीव, सुंदर अशी ती मुलगी आपली सून आहे हे ऐकून निराबाईंना - विठ्ठलपंतांच्या आईला-अभिमान वाटला. त्यांनी रुक्मिणीला पोटाशी घेतले. त्या म्हणाल्या, ''रुक्मिणी, बाळ, आम्ही भाग्याचे आहोत. तुझ्यासारखी गुणी सून आम्हाला लाभली. पोरी, माझा विठ्ठल भाबडा आहे, त्याला जप. तू त्याची सावली होऊन त्याला साथ दे!'' आपल्या सासूबाईंचे ते प्रेमळ बोलणे ऐकून रुक्मिणीबाईंना आई लाभल्याचा आनंद झाला.

## लक्ष परमेश्वराकडे

ती त्यांची मनापासून सेवा करू लागली. आपल्या मुलाचा सुखी संसार पाहून विठ्ठलपंतांचे वडील-गोविंदपंत निश्चिंत झाले. म्हातारपणामुळे त्यांची तब्येत ठीक राहात नसे. मुलगा आणि सून यांच्या सहवासात त्यांना स्वर्गसुख मिळत असे. दिवस असेच मजेत

जात होते. एके दिवशी नित्याप्रमाणे निराबाईंनी पूजा वगैरे आटोपली. पण त्यांना बरे वाटेना. त्यामुळे त्यांनी सूनबाईला आणि मुलाला जवळ बोलावले. गोविंदपंतांच्या मांडीवर आपले डोके ठेवून त्या शांत पडून राहिल्या. मग म्हणाल्या, ''तुमचा सर्वांचा निरोप घ्यायची वेळ आली आहे.'' विठ्ठलपंत आणि रुक्मिणीचे डोळे पाणावले. गोविंदपंत व्याकुळ स्वरात म्हणाले, ''असं काय बोलतां?'' ''खरं तेच सांगते! सोन्यासारखा संसार केला, तुमच्यासारखा पती, विठ्ठलासारखा पुत्र आणि रुक्मिणीसारखी सून! याहून जास्त काय हवं होतं मला? मूर्तिमंत हिरेच लाभले मला! तेजस्वी! ज्ञानी! आणि आता तुमच्या मांडीवर डोकं ठेवून, विठ्ठलाचा हात हातात घेऊन, रुक्मिणीला जवळ घेऊन भरल्या कपाळानं मला मरण येतं, हे तर माझं केवढं सौभाग्य! तुमचं रूप डोळ्यात साठवत मला निरोप घेऊ दे. तुम्हीही मला हसत हसत निरोप द्या!'' निराबाईंचं बोलणं ऐकून रुक्मिणीला हुंदका फुटला. प्रसन्न आणि तृप्त मनाने निराबाईंनी जगाचा कायमचा निरोप घेतला. त्यानंतर काही काळातच गोविंदपंतांचेही म्हातारपणामुळे निधन झाले. संसाराची जबाबदारी आता खऱ्या अर्थाने विठ्ठलपंतांवर पडली.

पण त्यांचं मन संसारात रमेना. त्यांना लळा होता पांडुरंगांचा! परमेश्वराचा! त्यांचं लक्ष होतं भजनात! नामस्मरणात! संसारातील गोष्टीत त्यांना रस नव्हता. म्हणून एकदा ते रुक्मिणीला म्हणाले, ''रुक्मिणी, मला काशीला जावंसं वाटतं. तरी तू मला संन्यास घेण्याची आज्ञा दे!'' संन्यास म्हणजे संसाराचा त्याग करून, बायकोचा त्याग करून विरक्तपणे राहाणे व देवाचे नाव घेत, देवाच्या भजनपूजनात, कीर्तनात आयुष्य सार्थकी लावणे. या गोष्टीला अर्थातच रुक्मिणी कशी तयार होणार? ती म्हणाली,

''नाथ, तुम्ही माझे संरक्षक, त्राता, भाग्यविधाता आहात. तुमच्या सुखदु:खाची मी वाटेकरी आहे. आपण सुखाने संसार करू या. मुलंबाळं झाली की माझ्या जन्माचं सार्थक होईल.'' पण विठ्ठलपंतांनी तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलं म्हणून रुक्मिणीने आपल्या वडिलांना विठ्ठलपंतांबद्दल सारं कळवलं, तिचे वडील आपेगावी आले आणि ते विठ्ठलपंतांना समजावून मुलीला व जावयाला बरोबर घेऊन आळंदीला परत आले. तिथेही त्यांनी ती परवानगी देत नाही असं पाहून एक युक्ति केली. एकदा रुक्मिणीबाई घरकामात मग्न आहे असे पाहून तिच्या गडबडीचा फायदा घेऊन विठ्ठलपंतांनी तिला विचारलं, ''मी गंगेवर स्नानाला जाऊ का ?'' रुक्मिणी भोळी होती. तिला वाटलं, ते इंद्रायणी नदीवर स्नानाला जात असावेत. ती म्हणाली, ''हो. जा ना!'' झालं. तिची हीच परवानगी समजून ते सरळ काशीला गंगेत स्नान करायला गेले.

## विठ्ठलपंत संन्यास घेतात.

त्यावेळी काशीला रामानंदस्वामी म्हणून एक थोर, विद्वान स्वामी राहात होते. विठ्ठलपंत त्यांना भेटले. म्हणाले, ''स्वामीजी, कृपा असावी. अनुग्रह द्यावा.'' ''कोण तुम्ही ?'' रामानंदस्वामींनी विचारले. ''मी विठ्ठलपंत! मी एकटाच आहे, बायकामुलांचा पाश मला नाही. आपण मला संन्यासाची दीक्षा द्यावी ही माझी आपल्या चरणी नम्र विनंती आहे.'' त्यांचे ते मधुर आणि प्रांजल स्वरातील बोलणे ऐकून रामानंदस्वामींचा त्यांच्यावर विश्वास बसला. त्यांनी विठ्ठलपंतांना मंत्रदीक्षा देऊन संन्यास दिला. परंतु रुक्मिणी बिचारी इथे नवऱ्याच्या काळजीने दु:खी झाली. आपला नवरा स्नान करायला म्हणून जो गेला तो परत कसा आला नाही याचे तिला आश्चर्य वाटले. ती आपली त्याच्या आठवणीने

रडत बसू लागली. एके दिवशी शेजारच्या बाईकडे ती देवळात येणार का म्हणून विचारायला गेली. तो काय! ती बाई म्हणाली, ''अहो रुक्मिणीवैनी, तुमचे यजमान कुठे गेले कळलं का?''

''नाही हो! दिवसरात्र मी त्याच काळजीत आहे. काय करू हो? कुठे शोधू त्यांना?'' तिने व्याकूळ स्वरांत विचारलं.

''अहो, शोधतां काय? त्यांनी तर संन्यास घेतला बरं का काशीला जाऊन!'' ती शेजारीण म्हणाली.

''क...काऽय? संन्यास? पांडुरंगा! हे असं कसं झालं?'' असं म्हणत रुक्मिणी खाली कोसळली. शेजारणीने तिला पाणी प्यायला दिलं. म्हटलं, ''रुक्मिणीवैनी, झालं ते झालं! उगा जिवाला दु:ख कशाला द्यायचं?''

रुक्मिणी काही न बोलता घरी आली. तिने मनाशी ठरवलं, आता दु:ख न करता परमेश्वराची भक्ती करीत राहायचं! निरपेक्ष मनाने त्या सावळ्या पांडुरंगाची सेवा करायची. त्याचं नामस्मरण करायचं, एक वेळ जेवायचं, कुणात जास्त मिसळायचं नाही. बस! ठरलं! असंच वागायचं! त्याप्रमाणे ती तिचं आयुष्य कंठू लागली.

## आणि रुक्मिणीचं भाग्य खुललं

एके दिवशी एक विलक्षण घटना घडली. प्रत्यक्ष रामानंदस्वामीच आपल्या शिष्यांना बरोबर घेऊन रामेश्वराच्या यात्रेला निघाले होते. वाटेत ते आळंदीला थांबले. मारुतिरायाच्या देवळात त्यांचा मुक्काम होता. स्नान वगैरे उरकून मंडळी आरामात बसली होती. इतक्यात रुक्मिणी तिथे आली. मारुतीच्या दर्शनाला! तिने मारुतीरायाला मनापासून नमस्कार केला. तिचे लक्ष रामानंदस्वामींकडे गेले. ते एक महान स्वामी असावेत हे तिने

ओळखले. म्हणून तिने भक्तिभावाने त्यांचे पाय धरून त्यांना नमस्कार केला. रामानंदस्वामी तिला आशीर्वाद देत म्हणाले, ''पुत्रवती हो!'' ते ऐकून रुक्मिणी हसू लागली. ''कां? तू कां हसतेस?'' स्वामींनी विचारलं. ''स्वामीजी, आपण मला पुत्रवती होण्याचा आशीर्वाद दिला आहे. पण माझ्या पतींनी तर काशीला जाऊन संन्यास घेतला आहे. तेव्हा तुमचा आशीर्वाद खरा कसा होणार?'' रुक्मिणीने सांगितले. ''म्हणजे? मला तुझ्या पतीबद्दल माहिती सांग. तुझ्या परवानगीवाचून त्याने संन्यास घेतला का?'' स्वामींनी विचारलं.

''हो.'' असं म्हणून रुक्मिणीने विठ्ठलपंतांची सगळी माहिती रामानंदस्वामींना सांगितली. ती ऐकून त्यांची खात्रीच पटली की बारा वर्षांपूर्वी ज्या विठ्ठलपंतांना आपण संन्यासाची दीक्षा देऊन ''चैतन्याश्रम'' असे नामकरण केले होते तोच रुक्मिणीचा नवरा असला पाहिजे. त्यांना वाईट वाटले. नकळत आपण एका तरुण, संसारी स्त्रीला संसारातून उठवायला कारणीभूत झालो याची त्यांना खंत वाटू लागली. रुक्मिणीला संसारसुख मिळावे या हेतूने ते रामेश्वरला न जाता सरळ काशीला गेले. त्यांनी आपल्याबरोबर रुक्मिणीला व सिधोपंतांनाही घेतले होते.

काशीला गेल्यावर त्या दोघांना वेगळ्या घरी ठेवून रामानंदस्वामी आपल्या मठात गेले. चैतन्याश्रम ग्रंथ वाचीत बसले होते. रामानंदस्वामींना इतक्या लवकर यात्रेहून परतलेले पाहून त्यांनी विचारलं, ''स्वामीजी, आपण थोड्या कालावधीत यात्रा आटोपलेली दिसते.''

''हो. कारणच तसं घडलं.'' स्वामी शांतपणे म्हणाले.

''म्हणजे?'' चैतन्याश्रमानी आश्चर्यानं विचारलं.

''यात्रा करीत करीत मी आळंदीला गेलो....'' स्वामी सांगू लागले.

'आळंदी' हा शब्द कानी पडताच चैतन्याश्रम गोंधळले, चपापले. ''क...क... काय? आळंदी?'' त्यांनी घाबरत विचारलं.

''होय. तिथे मला मारुतीच्या देवळात एक पतिव्रता स्त्री भेटली. रुक्मिणी तिचं नांव....'' स्वामी पुढे म्हणाले. चैतन्याश्रम मान खाली घालून उभा होता. ''चैतन्या, बोल, तू ओळखतोस तिला?'' ''होय स्वामीजी. माझं चुकलं! मी आपल्याशी खोटं बोललो. खोटं कधी लपून राहात नाही हे मी विसरलो. मला क्षमा करा.'' चैतन्याश्रमाने स्वामीजींचे पाय धरले.

''ठीक आहे. मी तुला क्षमा करीन. पण तू तुझ्या पत्नीचा स्वीकार कर. पुन्हा संसार करायला लाग. त्यात काहीही गैर नाही.'' रामानंदस्वामींनी म्हटलं.

''जशी आपली आज्ञा! गुरूची आज्ञा मला मान्य आहे.'' चैतन्याश्रम म्हणाले. ते ऐकताच स्वामींनी रुक्मिणीला आणि सिधोपंतांना त्या ठिकाणी बोलावून घेतले. ''रुक्मिणी, आता पुन्हा सुखाने संसार कर!'' ते म्हणाले. सिधोपंत ते ऐकून खूष झाले. आपली पोरगी आता मार्गाला लागली हे पाहून त्याच्या डोळ्यात पाणी आले. रुक्मिणीने हळूच विठ्ठलपंतांकडे पाहिले. त्यांना पाहून तिला आधार मिळाल्यासारखे वाटले.

''विठ्ठलपंत, चला. निघू या!'' सिधोपंत म्हणाले. ''जा विठ्ठला, रुक्मिणीबरोबर चांगला संसार कर, आणि हो, रुक्मिणी, पी दिलेला आशीर्वाद फुकट गेला नाही हे तुला पटलंच असेल.'' रुक्मिणीने लाजत लाजत मान हलवली. स्वामींना नमस्कार करून तिघेजण आळंदीला परतले.

## वा रे संन्यासी ! हॅ हॅ हॅ !

विठ्ठलपंत संन्यास टाकून पुन्हा गृहस्थाश्रमात आले ही बातमी वाऱ्यासारखी साऱ्या आळंदीभर पसरली. जवळ जवळ साडेसातशे वर्षांपूर्वीचा काळ तो ! धर्माविरुद्ध, शास्त्राविरुद्ध वागणाऱ्यांना समाज वाळीत टाकीत असे. त्यांच्याशी कुणी संबंध ठेवीत नसत. विठ्ठलपंतांच्या बाबतीत तेच झालं. ''अगबाई, काय तरी हे वागणं ! आधी लग्न केलं, मग संन्यास घेतला, आता पुन्हा संसारात आले ! देवा, देवा ! कुठे फेडणार हे पाप ?'' अशी शेजारची बायकामंडळी आपआपसात कुजबुजू लागली. ''वा रे संन्यासी ! संन्यास घेणं म्हणजे काय लाडू खाण्याइतकं सोपं आहे का ? मनावर ताबा ठेवावा लागतो. आला ना पुन्हा संसारात ! आता बस म्हणावं लोकांच्या शिव्या खात !'' असे कर्मठ ब्राह्मण एकमेकांना सांगून विठ्ठलपंतांची टर उडवू लागले. कुणी म्हणालं, ''काय तरी ही बायको ! पुन्हा कशाला गेली नवऱ्याच्या मागे ? आणला त्याला परत ! लोकांचे अपमान सहन करावे लागणार आता त्या विठ्ठलपंताला !'' कुणी म्हणे, ''एवढे विद्वान रामानंदस्वामी ! पण संन्यास घेतलेल्या विठ्ठलपंताला पुन्हा गृहस्थाश्रमाची दीक्षा कशी बरं दिली ? कमालच आहे ! धर्मशास्त्राची पर्वाच करीत नाही कुणी !'' अशाप्रकारे कुणी विठ्ठलपंतांना दोष देई तर कुणी रुक्मिणीला ! पण ती दोघेही हे अपमानास्पद बोलणे निमूटपणे ऐकून घेत असत. विठ्ठलपंत ज्ञानी होते, धैर्यशील होते, त्यांनी मोठ्या हिमतीने आपला संसार सुरू केला. लोकनिंदेची मुळीच पर्वा केली नाही. ते रुक्मिणीला म्हणाले, ''रुक्मिणी, माझ्यामुळे तुला ही हेटाळणी, ही मानहानी सहन करावी लागते.''

"असं नका म्हणू! तुम्ही परत आलात यातच मला सगळं मिळालं. निंदा करणं लोकांचा स्वभावच आहे. जो तो आपल्या स्वभावधर्मानुसार वागणार, तुम्ही मनाला क्लेश करून घेऊ नका. तुमची सोबत असल्यावर मी सर्व गोष्टींना तोंड देऊ शकेन." रुक्मिणीने म्हटलं. विठ्ठलपंत तिचे बोलणे ऐकून प्रसन्न झाले. त्यांच्या मनातील बोच कमी झाली. घरी पाळणा हलू लागला.

अशा रीतीने त्यांचा संसार दोघांच्या एकमेकावरील प्रेमामुळे आनंदाने चालू झाला. त्यांना काही दिवसांनी एक मुलगाही झाला. विठ्ठलपंत आणि रुक्मिणी आता अगदी तृप्त झाले. त्यांनी मुलाचं नांव ठेवलं, निवृत्तिनाथ! त्याच्या तेजस्वी, सुंदर मुखाकडे पाहून रुक्मिणीला धन्य धन्य झालं. लोकांची निंदानालस्ती विसरून ती निवृत्तिनाथाचे खूप प्रेमाने संगोपन करायची. त्याला न्हाऊमाखू घालायची, मऊमऊ भात भरवून त्याला अंगाईगीत म्हणून निजवायची. निवृत्तिनाथ दोन वर्षांचा झाला. रुक्मिणीने दुसऱ्या मुलाला जन्म दिला. त्याचे नाव त्यांनी ठेवले 'ज्ञानदेव'; ज्ञानाचा देव! ज्ञानदेव दिसायला राजबिंडा होता. तेज:पुंज होता. त्याच्या लडिवाळ सहवासात विठ्ठलपंत आणि रुक्मिणी आपल्या संसारातील हालअपेष्टा विसरून जात.

"रुक्मिणी, खरंच! निवृत्ती आणि ज्ञानदेव कसे सुरेख दिसतात. किती हुशार आहेत दोघे! अगदी दृष्ट लागावी..." त्यांच्या तोंडावर आपला उजवा हात ठेवीत रुक्मिणी म्हणाली, "नका हो असं बोलू! परमेश्वर दयाळू आहे. कधी तरी लोक आपली किंमत ओळखतील. आपलं काही चुकलं नाही हे त्यांना कधीतरी कळेलच." दोन्ही मुलांच्या बाललीलात दिवस भुर्रकन् जात होते. ज्ञानदेव दोन वर्षांचा झाला आणि सोपानाचा जन्म

झाला. हे तिन्ही मुलगे अतिशय सुंदर, सुदृढ आणि हुशार होते. विठ्ठलपंतांना जन्माचं सार्थक झालं असं वाटायला लागलं. सोपान तीन वर्षांचा झाला आणि रुक्मिणीने एका सुकुमार सुंदर मुलीला जन्म दिला. विजेसारखी तेजस्वी होती ही मुलगी. त्यांनी तिचं नांव ठेवलं मुक्ता! दिसायला भारी गोड! भारी लाघवी! रुक्मिणीला तर त्या मुलीला कुठे ठेवू नि कुठे नको असं होऊन गेलं. तिला काजळतीट करतांना रुक्मिणीला खूप खूप समाधान मिळायचं. जाईच्या फुलासारखी कोमल मुक्ता आईच्या हाताच्या पाळण्यात बाळसं धरत होती. विठ्ठलपंतांच्या घरी असं गोकुळ नांदू लागलं. चार तेजस्वी मुलं म्हणजे त्यांचे जीव की प्राण होते.

## संन्याशाच्या पोरांच्या मुंजी ?

बघता बघता निवृत्ती ८ वर्षांचा झाला. विठ्ठलपंत रुक्मिणीला म्हणाले, ''रुक्मिणी, निवृत्तीची मुंज करायला हवी! तुला काय वाटतं?'' रुक्मिणी भाकरी करीत होती. चुलीच्या ज्वाळेच्या उजेडात तिचा तेजस्वी चेहरा जास्तच उजळला होता. तिच्या डोळ्यासमोर निवृत्तीच्या मुंजीचा सोहळा उभा राहिला. नथ घालून, नवं लुगडं नेसून आपण विठ्ठलपंतांच्या शेजारी मुंजीचं देवक बसवत आहोत, सगळा गाव मुंजीला आला आहे, जेवणावळी उठत आहेत, सनई चौघडा वाजत आहे, चिमुरडी मुक्ताई बाळलेणं लेऊन भावाच्या मुंजीत मिरवत आहे, ज्ञानदेव-सोपानचे सर्वजण कौतुक करीत आहेत, लोकांनी बहिष्कार टाकायचं सोडून आपल्याला सर्वांना आपलसं केलं आहे, सगळीकडे नुसता आनंदीआनंद झाला आहे, निवृत्ती जानवं घालून, नवं धोतर नेसून पाटावर बसला आहे, आपल्या ताटातला उष्टा घास - लाडवाचा घास आपण त्याच्या मुखात भरवीत आहोत, त्याच्या गालावर काळी

तीट..." 'रुक्मिणी, अग भाकरी जळून चालली आहे. कसला विचार करतेस एवढा? मुंजीचा? विठ्ठलपंतांनी हळुवार स्वरात विचारलं.

"अग बाई! खरंच की!" म्हणत रुक्मिणीने भाकरी परतली. म्हणाली, "कसं माझ्या काळजातलं बोललांत. छोटासा निवृत्ती मुंजा मुलगा म्हणून छान शोभेल! पण खरंच, कधी करू या हो त्याची मुंज?"

"ते आपल्या हातात कुठे आहे? आपल्या चुकीची शिक्षा मुलांना मिळू नये एवढी माझी इच्छा आहे. त्यांच्या मुंजी व्हाव्यात, लोकांनी त्यांना जातिकुळाबाहेर टाकू नये, त्यांच्यावर लोकांनी बहिष्कार टाकू नये अशी माझी तळमळ आहे, रुक्मिणी! म्हणून त्यांच्या मुंजी व्हायला हव्यात. त्यासाठी देतील ते प्रायश्चित्त मी भोगावयास तयार आहे." विठ्ठलपंत अगदी करुण आवाजात म्हणाले. "मीसुद्धा प्रायश्चित्त भोगावयाला तयार आहे हो! माझ्या मुलांसाठी मी कोणतेही दिव्य करीन. पण लोकांनी आपल्या मुलांना हिडीसफिडीस करू नये! कशी सोन्यासारखी मुलं आहेत आपली! पण.. पण.. बिचाऱ्यांना सुखाचा घास नाही गिळायला देत! मी पाणी भरायला विहिरीवर गेले तर, माझी निंदा करू दे हो, पण..पण.. मुलांनाही संन्याशाची मुलं म्हणून.. म्हणून ..." बोलता बोलता रुक्मिणी रडायला लागली. विठ्ठलपंत तिची समजूत घालीत म्हणाले, "रुक्मिणी, हेही दिवस जातील. मी मुलांच्या मुंजी करण्याची परवानगी विचारतो. बघ, आपल्या चांगल्या वागणुकीने ब्राह्मणांचा राग मावळला असेल." रुक्मिणीने त्यावर म्हटलं, "असं झालं तर पांडुरंगाचीच कृपा म्हणायची." बोलता बोलता तिने पानं वाढली. "निवृत्ती, ज्ञानदेवा, सोपाना, या रे बाळांनो! गरम गरम भाकरी आहे, थंड होईल ती! लवकर या रे

माझ्या पाडसांनो!'' तिची ती हाक ऐकून मुलं धावत आली. मुलांना जवळ घेत त्यांच्या केसांवरून मायेनं हात फिरवीत रुक्मिणी म्हणाली, ''पाटावर बसा. भूक लागली ना?'' ''हो ग आई! खूप भूक लागली आहे. भाकरीची पण आणि तुझ्या मायेची पण! आई, एक घास भरव ना मला!'' सोपान म्हणाला. त्याला भरवीत रुक्मिणी म्हणाली, ''ज्ञानदेवा, दमलास? जेव पोटभर!''

''तुला पाहिलं की सगळा थकवा दूर पळतो. आई, आमच्यासाठी एवढे कष्ट करून तूच दमली असशील. खरच, मी तुला मदत करू का ग?'' रुक्मिणीचे डोळे, ते बोलणं ऐकून भरून आले. हा मुलगा आपल्या पोटी आला आणि आपला जन्म सार्थकी लागला असंच तिला वाटलं. पाटावर बसलेली ज्ञानदेवाची ती गोंडस, चिमुकली मूर्ति पाहून वात्सल्यपूर्ण शब्दात ती म्हणाली, 'ज्ञानदेवा, वेड्या, मुलांसाठी कष्ट केले तर आई कधी दमते का रे? आणि तुमच्यासाठी काय मोठंसं करते रे मी? काही करावं म्हटलं तर.. तर लोकांचा छळ! लोकांचा बहिष्कार! मनासारखं तुम्हाला काही करून घालते का मी?'' रुक्मिणीनं विचारलं, ''आई, असं कां बोलतेस? आमच्या आवडीचे किती जिन्नस करतेस तू! तोंडचा घास काढून आम्हाला भरवतेस! आणि तू व बाबा जवळ असताना आणखी काय हवं आम्हाला? खरं सांगू? तुझा हात लागला की अन्नाला किती गोडी येते ग आई!'' ज्ञानदेवानं म्हटलं. ज्ञानदेवाचं बोलणं ऐकता ऐकता निवृत्तीचे कान तृप्त झाले. तो म्हणाला, ''ज्ञानदेवा, असं वाटतं, तू नुसतं बोलत राहावंस आणि आम्ही ऐकत राहावं.'' इतक्यात छोट्या मुक्तेला घेऊन विठ्ठलपंत तिथे आले. म्हणाले, ''ही बसली होती पांडुरंगाच्या समोर! त्याला बघत! ''हो का ग मुक्ते! सोने, ये, तुला दूधभात भरवते.'' असं म्हणून रुक्मिणीने मुक्तेला उचलून घेऊन तिचे मटामट मुके घेतले.

लडिवाळपणे हसत मुक्तेने आईच्या गळ्याभोवती आपल्या चिमुकल्या हातांनी मिठी घातली. हसतखेळत साऱ्यांची जेवणं झाली.

## ''माझ्या लेकरांवर दया करा हो!''

नंतर विठ्ठलपंत बाहेर बैठकीच्या खोलीत आले. मनाशी काहीतरी विचार केला आणि म्हणाले, ''रुक्मिणी, मी जाऊन येतो. मुलांच्या मुंजीचं पाहायला हवं ना!'' रुक्मिणी बाहेर बैठकीच्या खोलीत येईपर्यंत ते गेले सुद्धा! ''भारीच बाई धांदल यांची! गेले वाटतं लगेच!'' असं म्हणत ती पुन्हा आत गेली. पण नवऱ्यावरच्या प्रेमाने तिचा ऊर भरून आला. आपल्या पोटच्या लेकरांसाठी उन्हातान्हात वणवण करून त्यांच्या मुंजीसाठी परवानगी विचारायला बाहेर पडलेल्या विठ्ठलपंतांची तिला मनोमन करुणा आली.

विठ्ठलपंत सरळ, धर्मशास्त्रात, वेदशास्त्रात पारंगत असलेल्या पैठणकर ब्राह्मणापुढे जाऊन उभे ठाकले. त्या ब्राह्मणांना साष्टांग नमस्कार घातला. हात जोडून ते अत्यंत नम्रतेने म्हणाले, ''हे श्रेष्ठांनो, माझ्यासारख्या दीन दुबळ्या पापी माणसाला आता तुम्ही पावन करून घ्या. माझा अपराध पोटात घाला. शपथ घेऊन मी सांगतो की माझ्या गुरूच्या आज्ञेवरूनच मी पुन्हा संसार थाटला. या चुकीचं जे प्रायश्चित्त असेल ते भोगायला मी तयार आहे. तुम्ही मला हवी ती शिक्षा करा, दंड करा, पण माझ्या लेकरांवर बहिष्कार टाकू नका. लेकरांनी बापड्यांनी काहीसुद्धा अपराध नाही केला हो! त्यांच्या मुंजी होतील असा मला शास्त्राचा आधार सांगा. त्यांना माणसात घ्या. माझ्या कोवळ्या, निरपराध...'' ''निरपराध कशी? तुमच्यासारख्या संन्याशाच्या पोटी जन्म घेतला हाच तर

अपराध आहे त्यांचा! कळलं?'' शास्त्रीबुवांनी विचारलं. शास्त्रीबुवांचं बोलणं ऐकून विठ्ठलपंतांच्या काळजाला घरं पडली. आपल्या कोवळ्या मुलांचा अपराध? आपल्या पोटी जन्म घेतला हा अपराध? परमेश्वरा! हे मी काय ऐकतो आहे!

## ''याला फक्त देहान्ताची शिक्षा!''

''श्रेष्ठांनो, असं नका बोलूं! माझ्या मुलाबाळांवर कृपा करा. मला शिक्षा द्या! मी तुमच्या पाया पडतो.'' विठ्ठलपंत म्हणाले.

पण विठ्ठलपंत, शास्त्रात संन्याशाच्या मुलांच्या मुंजी करण्याची परवानगी नाही. तसेच तुमच्या अपराधास शास्त्रात प्रायश्चित्त नाही. तुमचा अपराध एवढा महान आहे की, त्याला फक्त देहान्त प्रायश्चित्ताचीच शिक्षा आहे.'' शास्त्रीबुवा म्हणाले.

विठ्ठलपंतांनी ती शिक्षा ऐकली. आपल्या गुणी मुलांच्या भविष्यकाळ उज्ज्वल करण्यासाठी त्यांनी तो निर्णय मान्य केला.

''ठीक आहे. जशी आपली आज्ञा! माझ्या बलिदानाने माझ्या मुलांना चांगली वागणूक मिळणार असेल तर मी देहत्याग करायला तयार आहे.''

ब्रह्मवृंदाने त्यांच्याकडे हेटाळणीने पाहिले. विठ्ठलपंत घरी आले. संध्याकाळची वेळ होती. रुक्मिणी तुळशीपुढे सांजवात लावत होती. अशाच एका तिन्हीसांजेला रुक्मिणीची आई तुळशीकडे दिवा लावत होती. त्यावेळी रुक्मिणीची आणि विठ्ठलपंतांची पहिल्यांदा भेट झाली होती. आता जगाचा निरोप घेतानाही रुक्मिणी सांजवात लावत होती. जणू रुक्मिणी म्हणजे स्वत: जळून दुसऱ्यांना उजळणारी सांजवातच होती. पवित्र! शांत! विठ्ठलपंतांची चाहूल लागल्यावर तिनं वळून पाहिले. डोक्यावरचा पदर सावरत तिनं विचारलं, ''काय झालं?'' विठ्ठलपंतांचा उदास

चेहरा पाहून खरं तर तिला सारं काही कळलं होतं. मुंजी होणार नाहीत याची तिला कल्पना आली. मायेनं विठ्ठलपंताचा हात धरून ती म्हणाली, ''कळलं मला! नका दु:खी होऊ.'' बोलता बोलता ती तुळशी वृंदावनापाशी बसली. मुलं आत देवाचं भजन करीत होती. विठ्ठलपंत तिच्या शेजारी बसत म्हणाले, ''मुंजी करता येणार नाहीत हे तर खरंच! पण रुक्मिणी, आपल्या मुलांना सुख मिळावं, लोकांनी त्यांना वाळीत टाकू नये, म्हणून तू काय करायला तयार आहेस?''

''हे काय विचारणं? नाथ, मी प्राणसुद्धा द्यायला तयार आहे हो!'' कळवळून रुक्मिणी म्हणाली.

''हो ना? रुक्मिणी, मग ती कसोटीची वेळ आज आली आहे.'' विठ्ठलपंत शांतपणे म्हणाले.

''म्हणजे?'' रुक्मिणीने चमकून विचारलं. ''हो! शास्त्रीबुवांनी माझ्या अपराधाला देहान्ताची शिक्षा सांगितली आहे.''

''माझ्या नाही, आपल्या! ठीक आहे! तुम्ही सांगाल तेव्हा जाऊ! प्रायश्चित्त घ्यायला!'' रुक्मिणी धीरगंभीरपणे म्हणाली खरी पण १।। - २ वर्षाच्या मुक्ताची आठवण होऊन तिच्या मनात चरकलं. जिला अजून धड बोलताही येत नाही त्या कोवळ्या लेकीला उघड्यावर टाकून जायचं? त्यांचा चेहरा एकदम कावराबावरा झाला.

''रुक्मिणी, मुक्तेसाठी जीव कासावीस होतो आहे ना?'' विठ्ठलपंतांनी विचारलं.

''हो! आणि निवृत्ती तरी असा कितीसा मोठा आहे? आणि माझा ज्ञानदेव? सोपान? एवढी एवढीशी मुलं माझी! आधीच

लोक टोचून टोचून त्यांना जीव नकोसा करतात. त्यात आपलं छत्र नाहीसं झाल्यावर तर....'' रुक्मिणीला हुंदका फुटला.

''अग, रडू नकोस! त्यांच्या कल्याणासाठीच ना आपण देहत्याग करणार आहोत? मग? आणि आपली मुलं तेजस्वी आहेत, बुद्धिवान आहेत, बालसूर्य कोवळा असला म्हणून का त्याचं तेज कमी असतं? त्यांची काळजी आता पांडुरंगावर सोपवू! पण खरंच रुक्मिणी, ही मुलं आपलं नांव उज्वल करतील अशी मला खात्री वाटते.'' विठ्ठलपंत मुलांवरच्या ममतेने भारावून बोलत होते.

## ''हे गंगामाते, आम्हाला पोटात घे.''

रात्री नेहमीप्रमाणे जेवणं झाली. पण कां कोण जाणे मुलांच्या मनांत आलं, की आईबाबा बेचैन असावेत. ज्ञानदेवाने विचारलं, ''आई, आज इतका त्रास घेऊन माझ्या आवडीची भाजी कां ग केलीस इतक्या उशीरा?'' ''बाळा, तुला माझी आठवण राहावी म्हणून! आवडीचं जेवू घालण्यापलीकडे तुला काय देणार रे मी सोन्या?'' आणि बोलता बोलता ज्ञानदेवाला पोटाशी घेऊन रुक्मिणी रडायला लागली. त्याला भरवायला लागली. मुक्तेला मांडीवर घेऊन तिने तिला काजळतीट केलं. म्हणाली, ''आता माझ्या बाळीला कुण्णाची दृष्ट नाही लागणार!'' सोपानाला दोन घास भरवून ती म्हणाली, ''राजा, मुक्तेचा मोठा भाऊ तू! तिला जप रे सोपाना!''

''आई, अग तुला झालं तरी काय?'' निवृत्तीनं विचारलं.

''बाळा, उभ्या आयुष्याचं प्रेम करायला मला परमेश्वराने फक्त एवढासाच वेळ दिला रे! तेवढ्यात मला तुम्हाला पोट भरून पाहू

दे! डोळे भरून तुमच रूप न्याहाळू दे! असेच हसत रहा. हसत हसतच आम्हाला निरोप द्या!'' रुक्मिणी हुंदका आवरत म्हणाली.

''निरोप?'' निवृत्तीने विचारलं.

''हो! मग सांगते.'' रुक्मिणी म्हणाली. तिने पाठचं सारं आवरलं. पाट उचलून नीट भिंतीशी लावले. भांडी घासून टाकली. तोवर मुलं गोधड्यांवर निजली होती. एकटा निवृत्ती तेवढा जागा होता. त्याचं डोकं आपल्या मांडीवर ठेवून रुक्मिणीने त्याच्या कपाळाचा मुका घेतला. दोन्ही हातात त्याचं मुखकमल घेऊन ती म्हणाली, ''निवृत्ती, बाळा तुमच्या कल्याणासाठी आम्ही निरोप घेतो तुझा. बाळा, प्रश्न नको विचारूस! पण बघ, आजपासून तूच आई हो या मुलांची आणि तूच बाप हो! ज्ञानदेव म्हणाला होता ना, मला स्वयंपाकात मदत करायची म्हणून! माझ्या बाळाला स्वयंपाक करावा लागेल रे आता! पण तू जप त्याला! कुठे भाजेल त्याला! हाताला फोड येईल! हळवा आहे रे तो! आणि निवृत्ती... सोपानाला घास भरव बरं! सवय झाल्ये त्याला माझ्या भरवण्याची! अ हं! प्रश्न नाही विचारायचेस! नुसतं ऐक. आणि बाळा, मुक्तेला नीट सांभाळ. कसं सांगू? अंगणातल्या झाडावरच्या गुलाबाच्या कळीला जपतो ना तसं? नाहीतर सुकेल रे ती! पोरा! तुला लवकर मोठा केला आम्ही! पहिला जन्मलास ना! म्हणून तुझ्या शिरावर भार टाकून जातो आम्ही! बाळा, मुक्तेची वेणी घालताना हळूहळू विंचर बरं तिचे केस... तुटतील नाहीतर! आणि हो, ज्ञानदेवाची काळजी घे रे! रत्नालाच फार जपावं लागतं बघ! आणि माझ्या राजा, तुला पांडुरंगावर सोपवून मी जाते बरं! रडू नकोस निवृत्तिनाथा..'' रुक्मिणीचा आता बांध फुटला. विठ्ठलपंतांनी तिला सावरले. रडणाऱ्या निवृत्तीला जवळ घेतले. ज्ञानदेवाच्या शांत, झोपलेल्या चेहऱ्यावरून हळूच हात फिरवला.

सोपान आणि मुक्ता एकमेकांच्या गळ्यात हात घालून गाढ झोपली होती. मुक्ताच्या कपाळावर आलेले केस दूर सारीत रुक्मिणीने तिच्या गालाचा मुका घेतला. झोपेत मुक्तेने 'आई' अशी अस्पष्ट हाक मारली. तिची झोप चाळवली गेली. तिने रुक्मिणीचा पदर पकडून ठेवला. रुक्मिणीने हलकेच तिचा हात दूर केला आणि स्वत: तोंडात पदराचा बोळा घालून हुंदके आवरत ती घराबाहेर पडली. पाठोपाठ विठ्ठलपंतही निघाले.

आपल्या घराचा, मुलांचा मोह सोडून त्या दोघांनी प्रयागचा मार्ग धरला. तिथे पोचल्यावर देवाचे ध्यान करून विठ्ठलपंतानी आणि रुक्मिणीने गंगायमुनांच्या संगमात उडी घेतली.

## दादा आई कुठे रे गेली ?

दुसरे दिवशी निवृत्ती सकाळी लवकर उठला. रात्रीचा प्रसंग त्याला आठवला. आपल्याला लोकांनी वाळीत टाकू नये, आपले भविष्य उज्ज्वल व्हावे म्हणून आपल्या आईवडिलांनी काहीतरी सांगितल्याचे त्याला आठवलं. काय बरं म्हणाली होती आई ? आता आपल्या भावंडांची जबाबदारी आपल्यावरच टाकली आहे, असं काहीतरी ती सांगत होती. पण मग कुठे गेली आई ? बाबा ? निरोप घेते म्हणाली होती. नदीवर पाणी भरायला जातानाही ती पुन्हा पुन्हा मुक्तेकडे वळून बघायची. आणि आज ? सगळ्यांना सोडून गेली दोघं ? निवृत्ती तसा विचार करत असतानाच शेजारची राधाकाकू आली. घाबऱ्या स्वरात म्हणाली, ''निवृत्ती ! रे निवृत्ती,''

''काय हो काकू ?'' निवृत्तीने विचारलं.

''अरे, तुला कळलंच असेल'' काकू.

''काय ते ?'' निवृत्ती

''कान इथे कर! हां, अस्सा! अरे, तुझ्या आईनं आणि बापानं गंगेत जीव दिला म्हणे! खरं का?'' काकूनं विचारलं.

''काऽऽय? माझ्या आईनं गंगेत उडी घेतली? आई ग...'' निवृत्ती एकदम रडायला लागला. ''अरे, धर्माच्या विरुद्ध वागलं की असाच जीव द्यावा लागतो, रडतोस कशाला रे? संन्याशाच्या पोरा!'' काकूनं म्हटलं आणि फिदीफिदी हसत ती निघून गेली. आईबाबा गेल्याचं दुःख बाजूला सारून तो एकदम उद्गारला, ''संन्याशाची मुलं काय आम्ही! बघाच तर मग आमचा पराक्रम! आमच्या आईबाबांनी अशा वेदना सहन करून अखेर जीव दिला. तरी सुद्धा आमच्या माथ्याला लागलेला 'संन्याशाची मुलं' हा डाग धुतला कसा जाणार?'' तो असा रडत बसलेला असताना ज्ञानदेव जागा झाला - ''दादा, तू रडतोस?''

''ज्ञानदेवा, शेवटचं रडून घेतलं. पुन्हा नाही रडणार!'' निवृत्ती म्हणाला.

''पण मग तू रडत कां होतास रे?''

''ज्ञानदेवा... बाळा... आपली आई, आपले बाबा आपल्याला सोडून गेले! गंगेत उडी घेतली रे त्यांनी!'' निवृत्ती म्हणाला.

''पण कशासाठी?''

''आपलं कल्याण व्हावं म्हणून! लोकांनी आपल्याला वाळीत टाकू नये म्हणून ज्ञानदेवा!'' निवृत्ती म्हणाला.

''दादा, म्हणून का रे काल आईनं आपल्या सर्वांचे जास्त लाड केले? आता आपल्याला आई कोण रे दादा?'' ज्ञानदेवाने रडत विचारले.

## मीच तुझी आई

''ज्ञानदेवा, डोळे पूस! मी आहे ना! तुझा भाऊ! तुझी आई! तुझे बाबा! वेड्या, चल, आता हळूहळू माधुकरी मागून चूल पेटवली पाहिजे.'' निवृत्ती म्हणाला.

''दादा, तुला येते का रे चूल पेटवायला?''

''हो तर! स्वयंपाकसुद्धा येतो.'' निवृत्ती उसन्या अवसानाने उद्‌गारला. तोच सोपान आणि मुक्ताई उठली.

''आई... आई...'' उठताक्षणीच मुक्ता आईचा जप करू लागली. ज्ञानदेवानं तिला उचलून घेतलं नि म्हटलं, ''मुक्ते, आई गेली आपली.'' मुक्ताईला काहीच कळेना.

''वेडे, आई गंगा नदीमध्ये एकरूप झाली. ती पुन्हा येणार नाही. तू कितीही रडलीस, आरडलीस तरी ती येणार नाही ग!'' ज्ञानदेव स्वत:शीच पुटपुटत होता.

निवृत्ती, ज्ञानदेव माधुकरी मागायला जात. तेव्हा सोपान मुक्तेला सांभाळत बसायचा. हळूहळू मुक्ता मोठी झाली. स्वयंपाकपाणी पाहू लागली. घर स्वच्छ करू लागली. धान्य कांडू लागली. तिचे इवलेसे हात भराभरा काम करू लागले. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान तिला मदत करायचे. एकमेकांच्या बरोबर मजेत गप्पा करीत, हसत खेळत त्यांचे दिवस चालले होते. परंतु आईवडिलांनी प्रायश्चित्त घेऊनही लोक आपल्याला जवळ करीत नाहीत, तसेच मुंजीलाही ब्राह्मण परवानगी देत नाहीत याची त्या भावंडांना खंत होती. आळंदीच्या ब्राह्मणांनी निवृत्तिनाथांना सांगितले की, ''तुम्ही पैठणला जा आणि तेथील ब्राह्मणांकडून शुद्धिपत्र घेऊन या.'' निवृत्तिनाथांना हे बोलणे ऐकून खूप दु:ख झालं. त्यांना वाटलं, आपल्या मनाला जातीचा, कुळाचा विचारच शिवत नाही. मग मुंज

हवी कशाला ? सगुण, निर्गुण, द्वैत, अद्वैत यांच्या पलीकडे आपण पोचलो आहोत, म्हणजेच आपण सहजसिद्ध अवस्थेत आहोत, कुठल्याही विकारांच्या आहारी आपण नाही, सर्व दृष्टीनं, अर्थानं आपण निवृत्त झालो आहोत, मग व्रतबंधासारख्या संस्कारांची आवश्यकताच काय? थोडक्यात निवृत्तिनाथ सर्व चालीरीती, रूढी या बाबतीत उदासीन होते. त्या सर्वांच्या पलीकडे ते केव्हाच पोचले होते. तेही अवघ्या दहाव्या वर्षी ! याचं कारण म्हणजे पंथीय दीक्षा !

## ''अरे बापरे ! वाघ आला !''

या पंथीय दीक्षाग्रहणाची मोठी मजेशीर कथा आहे. एकदा विठ्ठलपंत आपल्या पत्नी व मुलांसमवेत त्र्यंबकेश्वराच्या दर्शनासाठी आले होते. तिथे गेल्यावर ते रोज मध्यरात्री स्नान वगैरे उरकून ब्रह्मगिरीस प्रदक्षिणा घालीत असत. असे जवळजवळ सहा महिने चालले. एका रात्री सर्वजण असेच प्रदक्षिणेसाठी बाहेर पडले असता त्यांच्या समोर एक अक्राळविक्राळ वाघ उड्या मारत डरकाळ्या फोडत आला. झालं! सर्वजण भीतीने गारठून गेले. विठ्ठलपंत आपल्या मुलांना सांभाळण्यासाठी मुलांच्यामागे धावले. पण तेवढ्या गडबडीत निवृत्तिनाथ वाट चुकले आणि ते पळता पळता अंजनीपर्वताच्या एका गुहेत शिरले. त्या गुहेत श्री गैनीनाथमहाराज आपल्या दोन शिष्यांसह तप करीत बसले होते. निवृत्तिनाथ वाट चुकून तेथे आले, नव्हे आधी वाट चुकल्यासारखे भटकणारे निवृत्तिनाथ आता योग्य वाटेवर आले हेच खरं ! कारण तिथे त्यांना त्यांच्या गुरूंचा लाभ झाला. हे गैनीनाथ होते तरी कसे ? तर त्यांच्या मस्तकावर जटा होत्या. कानांत कुंडलं होती, कंठात म्हणजे गळ्यात शैली, हातात शिंगी आणि पुंगी धारण केली होती, मुखाने

ते श्रीगुरुनामाचा नुसता घोष करीत बसले होते. निवृत्तिनाथांनी त्या दिव्य पुरुषाला पाहिले मात्र, त्यांनी त्यांच्या पायावर लोटांगण घातले. गैनीनाथांनी त्या कोवळ्या बालकाला पाहिले, आणि त्याच क्षणी त्यांना कळले की, हा आपला शिष्य व्हायला योग्य आहे, लायक आहे. मग त्यांनी निवृत्तिनाथांना श्रीकृष्णभक्तीचा मार्ग दाखवला, आणि नामस्मरणाचा प्रसार करण्याची आज्ञा केली. नामस्मरणात किती शक्ती आहे, किती लाभ आहे याची महती सर्वांना सांगण्याची त्यांना आज्ञा केली. ही पंथीय दीक्षा! गैनीनाथ अदिनाथसांप्रदायातले होते. निवृत्तिनाथानांही त्यांनी आता त्यांच्या सांप्रदायात मिळवून घेतले अशा या निवृत्तिनाथांना मुंजीसारख्या क्षुल्लक गोष्टींचं काय बरं महत्त्व असणार? पण ज्ञानेश्वरांचे विचार याबद्दल खूप वेगळे होते.

## ''ऐक तरी दादा!''

खरं तर निवृत्तिनाथ हे ज्ञानदेवांचे गुरु! ज्ञानेश्वर आपले विचार आपल्या गुरूंना नम्रपणे सांगताना म्हणाले, ''गुरुवर्य, आपले विचार मला कळत का नाहीत? आपल्या मनात किती खळबळ माजली आहे ती माझ्याशिवाय कुणाला कळणार? आपली थोरवी मला कळते, आपणासारख्या-प्रत्यक्ष शिवाला-शुद्धिपत्राची, मुंजीची काय आवश्यकता? सूर्यावर ढग जमले म्हणून का सूर्याचं तेज लपून राहतं? ढगांनी सूर्य थोडाच झाकता येतो? आपण सूर्यासारखे स्वयंप्रकाशित असताना आपल्या तेजाची, योगसामर्थ्याची ग्वाही दुसऱ्या कुणी देण्याची गरजच काय? हे सगळं सगळं मला कळतं, पण निवृत्तिनाथा, समाजात राहायचं असेल तर सामाजिक बंधनांकडे दुर्लक्ष कसं करतां येईल? माझ्या अल्प बुद्धीला असं वाटतं की प्रत्येकाने आपापला धर्म पाळावा,

आपापलं कर्तव्य करावं. ज्यानं जसं वागायला पाहिजे असं ठरलं आहे त्यानं तसंच वागावं. तोच त्याचा धर्म! मला तर वाटतं की, संतांनी आवर्जून स्वधर्म पाळला पाहिजे, कारण इतर सामान्य लोक संतांचा कित्ता गिरवतात. म्हणूनच वर्ण, जाति, धर्म याप्रमाणे स्वत: वागून इतरांनाही तसं वागायला शिकवलं पाहिजे. नाहीतर समाजात गोंधळ माजेल, अनाचार माजेल. लोक मनाला येईल तसे वागतील आणि त्यामुळे त्यांच्यावर कुणाचा प्रभाव राहणार नाही. गुरुवर्य, लोकांच्या सामाजिक सुरक्षिततेसाठी, हितासाठी, शांततेसाठी काही चालीरीती असणे, त्या पाळणे हे मला परम महत्त्वाचं वाटतं! मला कळतं, की आपण पूर्णावस्थेत पोहोचला आहात, पण तरीही शास्त्राच्या विरुद्ध वागून आपल्याला आपलं कार्य कसं करता येईल? माझं हे कळकळीचं म्हणणं ऐकून आपल्याला माझ्या प्रामाणिक भावनेची- लोकहिताच्या भावनेची- खात्री पटली असेल, हो ना? बोला, निवृत्तिनाथा! माझं काही चुकलं का? बोला... '' ज्ञानेश्वरांच्या या भाषणावर निवृत्तिनाथ मनातून खूष झाले. आपल्या शिष्याचं, भावाचं ते बुद्धिवैभव पाहून त्यांना धन्य वाटलं! ज्ञानदेव तेव्हा काहीतरी ११-१२ वर्षांचे असावेत! सोपानदेवांनाही मौंजीबंधनाची गरज वाटत नव्हती.

## ''आम्हाला शुद्ध करून घ्या''

शेवटी सर्व भावंडांनी पैठणला जाऊन तेथील विद्वान ब्राह्मणांकडून शुद्धिपत्र आणावयाचे ठरवले. आता शुद्धिपत्र म्हणजे काय? ही चारही भावंडे संन्याशाची मुले म्हणून त्यांची लोक कुचेष्टा करायचे, त्यातील तिन्ही भावांच्या मुंजीच्या विरुद्ध सर्वांचं एकमत होतं, तेव्हा या मुलांना शास्त्रात सोय असेल तर शुद्ध करून

घेतल्याचं, त्यांच्या मुंजीला परवानगी देण्याचं पत्र म्हणजे शुद्धिपत्र! पैठणला पोचल्यावर ही भावंडे त्यांच्या वडिलांच्या मामांकडे म्हणजे कृष्णाजीपंत देवकुळे यांच्याकडे उतरली.

चार दिवसांनी ज्या ब्रह्मवृंदांच्या सभेसाठी ती चारही भावंडे इतक्या उत्कंठेने आली होती ती सभा भरली. पैठणकर ब्रह्मवृंदांची ती सभा! तिचं वर्णन तरी कसं करावं? त्या सभेत एकापेक्षा एक असे विद्वान ब्राह्मण होते, त्यांचा श्रुति, स्मृति या ग्रंथांचा दांडगा अभ्यास होता, समाजात त्यांना फार मान होता, पांढऱ्याशुभ्र रंगाचे धोतर, पांढराशुभ्र सदरा, त्यावर बंद गळ्याचा कोट, डोक्यावर पगडी असा वेष घातलेले ते धर्मावर प्राणापलीकडे निष्ठा ठेवणारे बुद्धिवान ब्राह्मण त्या सभेत उपस्थित होते. आणि त्यांच्यासमोर शुद्धिपत्र मागायला ही चार कोवळी मुलं हजर झाली होती. निवृत्तिनाथ! अवघ्या १४ वर्षांचे! ज्ञानेश्वर फक्त १२ वर्षांचे! सोपानदेव दहा आणि चिमुकली मुक्ता आठ वर्षांची! पण ही मुलं होती मात्र तेजस्वी! तेजःपुंज! वयावर का कुणाचं श्रेष्ठत्व अवलंबून असतं? ते असतं बुद्धीवर! पराक्रमावर! एका बाजूला प्रौढ, विद्वान ब्राह्मण आणि दुसऱ्या बाजूला ओठ पिळले तरी दूध येईल अशी कोवळी बालकं! ही भावंडं जेव्हा सभास्थानी येऊन बसली तेव्हा मुंजीची परवानगी मागायला मुद्दाम आळंदीहून आलेल्या या संन्याशांच्या मुलांना बघायला शेकडो ब्राह्मणही सभामंडपात जमले होते. बुद्धीचं तेज चेहऱ्यावर पसरल्यामुळे तेजःपुंज दिसणाऱ्या त्या गोजिरवाण्या हसतमुख प्रसन्न बालकांना पाहून किती तरी माणसांच्या मनात त्या मुलांबद्दल जिव्हाळा उत्पन्न झाला. खरंच! कुणीही प्रेम करावं, कुणालाही आवडावीत अशीच गुणी बाळं होती ती! पण जगात चांगली माणसं असतात, तशी वाईटही असतातच. त्यांना त्या संन्याशाच्या मुलांना दूषणं द्यावीशी

वाटत होती. या मुलांची कुचेष्टा करावीशी वाटत होती. शास्त्रीलोक मात्र पोथ्या उघडून शास्त्राचा आधार शोधीत होते. तिन्ही प्रकारच्या, वृत्तीच्या त्या माणसांना पाहून निवृत्तिनाथ स्वत:शीच हसत होते तर ज्ञानदेव या सर्व गोष्टींचा काय बरं निर्णय लागेल याचा विचार करीत होते. सोपान नि मुक्ताबाई नामस्मरणांत दंग होते. ते दोघे मनाशी 'जय जय रामकृष्णहरी' चा जप करीत होते.

## फुलांना कुणी शुद्ध करतं का ?

तेही खरंच होत म्हणा! अंतर्बाह्य पारिजातकाच्या फुलासारखी निर्मळ, स्वच्छ, पवित्र असलेल्या त्या गोड, गोजिरवाण्या बाळांना शुद्धिपत्र हवंच होतं कशाला? तो तर समाजाच्या समाधानासाठी लोकांच्या समजुतीसाठी केलेला एक सोहळा होता. सीतामाई रावणाच्या घरी राहूनही शुद्ध होती, हे का रामाला माहीत नव्हतं ? पण तरीही गर्भवती सीतेला त्याला वनात सोडून द्यावं लागलंच ना ? लोकांच्या मनाचा आदर राखण्यासाठीच ना त्याने हे दिव्य केलं ? सीतेला वनात जितके कष्ट झाले त्यापेक्षा जास्त कष्ट तिच्यावरच्या अन्यायामुळे रामाला त्याच्या सुंदर महालात होत होते. तरीही धैर्याने रामानं आपलं कर्तव्य पार पाडलं. ही चारी भावंडंही धैर्यशील होती. म्हणून तर त्या विद्वानांच्या सभेत ती शांत बसून राहिली होती. मनाचं स्वास्थ्य जराही ढळलं नव्हतं त्यांच्या! चूलबोळकी आणि बाहुली घेऊन भातुकली खेळण्याच्या वयाची मुक्ताई धर्मशास्त्रज्ञांच्या सभेत गंभीरपणे त्यांची आज्ञा ऐकायला बसली होती. विद्वान पंडित धर्मशास्त्रावरची जाडी जाडी पुस्तकं काढून संदर्भ पाहात होते. पण यापूर्वी अशा प्रकारचा प्रसंग त्या पंडितांवर कधी आलाच नव्हता.

## ''ऐका तर आमचा निर्णय''

खूप वेळ चर्चा करून नि खल करून एकदाचा त्यांनी त्यांचा निर्णय सांगितला. तो निर्णय असा होता - संन्याशाच्या मुलांच्या मुंजी करण्याची धर्मशास्त्रात कोठेही पद्धत सांगितलेली नाही, म्हणजेच अशा मुलांच्या मुंजी करण्याची धर्मशास्त्रात आज्ञा नाही. त्यामुळे या चुकीबद्दल प्रायश्चितही सांगितलेले नाही, प्रायश्चित नसल्यामुळे तुम्हाला शुद्ध करून घेता येत नाही. म्हणून तुम्ही आहात तसेच रहा आणि रामाचे चिंतन करीत जा. सर्व माणसांशी नम्रतेने वागा. सर्व जग कृष्णस्वरूप पाहा. इंद्रियांवर ताबा मिळवा. लग्ने करू नका व संसार वाढवू नका. जोवर देह आहे तोवर देवाचे, श्रीहरीचे भजन करा, भक्ती करा. तरच तुमची पापे नष्ट होऊन तुम्ही शुद्ध व्हाल.'' हा निर्णय ऐकून त्या मुलांना काय वाटले असेल? जगातल्या सगळ्या ऐहिक, कौटुंबिक सुखांचा त्याग करून फ़क्त देव देव करीत बसायचं हे ऐकून त्यांना वाईट नाही वाटलं! उलट त्यांच्या कामाला या निर्णयामुळे जास्त गती येणार होती. ती बालकं आधीच या सर्व सांसारिक सुखांपासून विरक्त, निवृत्त झाली होती. 'श्रीहरी' हेच त्यांचे खरेखुरे आनंदाचे स्थान होते. त्या परमेश्वर माऊलीचं भजन व नामस्मरण करण्यासाठीच तर त्यांचा जन्म होता. त्यांना तो निर्णय आवडला.

## ''आम्ही कोण? ऐका तर''

ब्राह्मणांचा आदेश ऐकून ती चारही भावंडं खूष झाली हे पाहून त्या सभेतील मंडळींना आश्चर्याचा धक्का बसला. त्यांना वाटलं होतं की, हा निर्णय ऐकून मुलं रडकुंडीला येतील, त्यांची कमळासारखी टवटवीत आणि प्रसन्न असलेली मुखं कोमेजून जातील. त्यांच्या

पाणीदार आणि तेजस्वी डोळ्यांत अश्रू जमतील. पण छे! उलट ती मुलं जास्तच सुंदर आणि आल्हाददायक दिसू लागली. आणि त्यामुळेच तर त्यांच्याबद्दल तेथील मंडळींना जास्तच आदर वाटू लागला. शेवटी सभा संपण्याच्या वेळी कुणीतरी त्या मुलांना विचारलं,

''हं, तू निवृत्तिनाथ? हो ना? आणि तू रे? ज्ञानेश्वर! ज्ञानदेव! वा! वा! आणि तू? सोपान का? छान! छान! आणि ही चिमुरडी? मुक्ताई! नावं तर कशी मोत्यासारखी चमकदार आहेत! पण काय रे पोरांनो? या नावाचा अर्थ तरी काय आहे? ठाऊक आहे का? ठाऊक असला तर सांगा बघू आम्हाला!'' त्यावर आपल्या नावाचा अर्थ सांगताना निवृत्तिनाथ म्हणाले, ''मी निवृत्ती! ईश्वराच्या साक्षात्काराचा अत्युच्च पातळीवरचा आनंद भोगणारा मी राजयोगी आहे!

'मी तो निवृत्ति न पडेचि प्रवृत्ति मार्गी।
भोगी अखंड स्वसुखामृत राजयोगी।।

मी ज्ञानदेव म्हणिजे सकळागमाचा।
वेत्ता असे कथिन मी पुसता त्रिवाचा।।

मी ज्ञानांचा देव म्हणजे सर्व वेदांचा जाणता आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्ववेद, सामवेद आणि पाचवा महाभारत या वेदांचा मी जाणकार असून तिन्ही वाचेने मला विचारता मी त्यावर बोलेन.' असं ज्ञानेश्वरांनी म्हटलं. त्यानंतर सोपानदेवांनी आपल्या नावाचा अर्थ सांगताना म्हटले,

सोपान मी भजन दावुनि केशवाचे
वैकुंठ पावविन भक्तिमतांसि साचे।।

परमेश्वराच्या भक्तीचा मार्ग किंवा पायऱ्या दाखवून मी भक्तांना परमेश्वरप्राप्ती करून देईन. मी प्रत्यक्ष ह्या पायऱ्याच किंवा परमेश्वर प्राप्तीच्या मार्गाकडे जाण्याची शिडीच आहे.

आणि शेवटी चिमुकल्या मुक्ताईने आपल्या नावाचा अर्थ सांगितला. आपल्या स्पष्ट, करारी वाणीत ती उद्गारली,

मुक्ताइ मुक्ति उघडी जगदीशलीला
दावावया प्रगटली भुवनेकलीला।

मी मुक्ताई! आईबापाविना असलेली! पण प्रत्यक्ष परमेश्वराचीच लीला आहे मी! आणि त्याचे खेळ दाखवायला या पृथ्वीवर अवतरले आहे!

## हा रेडा तुझा भाऊ काय?

त्या कोवळ्या मुलांच्या तोंडून हे असं पांडित्यपूर्ण बोलणं ऐकून तर मंडळींना हसूच आवरेना. सभेतील लोक त्यांच्या नावाची चेष्टा करू लागले. म्हणाले, ''वा! मुक्ताई! म्हणे प्रत्यक्ष भगवंताचीच लीला, त्याचे खेळ या पृथ्वीवर करायला अवतरली आहे! आहाहा! दिवे ओवाळा! आणि हा ज्ञानेश्वर! ज्ञानाचा ईश्वर! ज्ञानदेव! ज्ञान हाच देव!'' कुणीतरी म्हटलं, ''नावात काय आहे? हा पखाल वाहणारा रेडा चालला आहे ना? त्या रेड्याचे नावसुद्धा ज्ञानदेव आहे. मग? दोघात फरक तो काय मग?'' ते ऐकून ज्ञानदेव शांत पण दृढनिश्चयी स्वरात म्हणाले, ''खरचं आहे ते! त्या रेड्यात आणि आम्हात काहीही फरक नाही. कारण,

रेडियांत आम्हात काही। भेद पाहता किंचित नाही।
आत्मा व्यापक सर्वादेही। भूतमात्रा सारिखा।।
अनंत घट भरले जीवनी। तितक्यात बिंबला वासरमणी।
तैसा व्यापक चक्रपाणी। भूतमात्री सारिखा।।

जर सर्व देहात एकच परमात्मा, एकच ईश्वर भरून राहिला आहे, एकाच ईश्वराने सर्वांना जन्माला घातले आहे, तर मग रेड्यात आणि आमच्यात मला जराही फरक जाणवत नाही. पाण्याने भरलेली खूप मडकी आहेत, एकाच सूर्याची सूर्यबिंबाची त्यात अनंत अनेक प्रतिबिंबं पडलेली आपण पाहतो, तसंच हे आहे. सूर्य एक, त्याची प्रतिबिंब अनेक! ईश्वर एक त्याची रूपं अनेक! माणूस, रेडा, ही सर्व त्याचीच तर रूपं आहेत.

जो खरा हुशार आहे, त्याचं लक्षं सूर्याच्या अनेक प्रतिबिंबातून दिसणाऱ्या एका बिंबावरच जातं, ते म्हणजे त्या परम तेजस्वी सूर्यबिंबावर! ही ईश्वराची अनेक रूपं पाहाताना भक्ताचं, जाणकाराचं लक्षही फक्त एकाच रूपावर जातं ते म्हणजे परमेश्वरावर! त्या अनेक रूपातून हा भक्त एकरूप बघतो! ते म्हणजे प्रत्यक्ष श्रीहरीच! सूर्यबिंब हे प्रतिबिंबाचे मूळ! कारण! निर्मितीचं स्थान! तसंच सर्वप्राणिमात्रांचं निर्मितीस्थान म्हणजे चक्रपाणी! श्रीकृष्ण! विष्णू! म्हणूनच परमेश्वर सर्व प्राणिमात्रात वास करून राहिला आहे. म्हणूनच हे श्रेष्ठांनो, माझ्यात आणि या रेड्यात मला कसलाच फरक जाणवत नाही.'' ज्ञानेश्वरांनी केलेले हे नम्रतेचे भाषण ऐकून एका ब्राह्मणाने हेटाळणीच्या स्वरात त्यांना विचारले, ''बरं तर! तुझ्यात आणि या रेड्यात फरक नाही, हो ना? थांब तर, अरे तो चाबूक आणा रे कुणीतरी!'' असं म्हणत ब्राह्मणाने चाबूक घेऊन त्या रेड्याच्या पाठीवर सपासप सपासप फटके मारले. एक! दोन! तीन! ''हं, या रेड्याच्या म्हणजे तुझ्याच पाठीवर मी तीन फटके मारले चाबकाने! बघू बरं तुझी पाठ! ह्यॅ! ह्यॅ! ह्यॅ! ह्यॅ!'' जोरजोरात हसत त्या ब्राह्मणाने म्हटले. ज्ञानेश्वरांनी आपली उघडी पाठ त्यांच्यापुढे केली. सर्वजण पाहू लागले तो काय! ज्ञानेश्वरांच्या तेजःपुंज पाठीवर तीन वळ उठले होते आणि तेथून रक्त

वाहू लागले. ते पाहून तेथे जमलेल्या लोकांना आश्चर्य वाटले आणि ज्ञानेश्वरांबद्दल आदर वाटायला लागला.

शेवटी तेथील लोकांचा निरोप घेऊन ज्ञानदेव, निवृत्ती, सोपान मुक्ताईसोबत आपेगांवी जाण्यासाठी निघाले. संध्याकाळची रम्य, शांत वेळ होती. गोदावरी नदी संथपणे वाहात होती. सूर्य अस्ताला जात होता. त्याचा लालसर प्रकाश आसमंतात भरून राहिला होता. अशावेळी काही तरुण ब्राह्मण ज्ञानेश्वरांकडे उपहासाने पाहात होते. ज्ञानेश्वर गोदावरीत स्नान करून, जाण्याच्या तयारीत किनाऱ्यावर शांतपणे बसले होते. त्यांना पाहून एक जण म्हणाला, ''अरे हाच तो ज्ञानदेव! रेड्याचा भाऊबंद! रेड्याच्या पाठीवर चाबूक मारल्यावर याच्या पाठीवर वळ उठले! म्हणजे बघ तरी किती जवळचं नातं आहे रेड्याशी! ह्यॅ ह्यॅ ह्यॅ!'' दुसरा म्हणाला, ''काय रे ज्ञानदेवा, रेडा खरच तुझ्यापेक्षा वेगळा नाही? तू आणि रेडा एकच आहात.''

''हो!'' ज्ञानदेव शांतपणे म्हणाले. ''छान! तर मग या रेड्याला वेद म्हणायला लाव बघू! तुला येतात ना वेद, तस्सेच त्याला म्हणायला लाव!'' तो ब्राह्मण ज्ञानदेवाची फजिती करण्यासाठी म्हणाला. त्याला वाटलं, आता ज्ञानदेव काय करणार? माणसासारख्या माणसाला जिथे वेद धड बोलता येत नाहीत तिथे रेडा तर जनावर! आता ज्ञानदेव काय करतात ते बघू! असं मनाशी म्हणत तो ब्राह्मण ज्ञानदेवांची मजा बघायला टपून बसला. ज्ञानदेव म्हणाले,

''तुमचं म्हणणं बरोबर आहे.''

त्यावर तो ब्राह्मण म्हणाला, ''हो ना? मग वेळ कां घालवतोस! ज्ञानदेवा, ये इथे आणि या रेड्याच्या तोंडून वेद बोलीव! बघू या तुझ्यासारखेच वेद रेडा बोलतो का ते!''

हे ऐकताच ज्ञानेश्वर उठून उभे राहिले. गोदातीरी जमलेल्या ब्राह्मणांना त्यांनी विनयाने आणि प्रसन्न मनाने दोन्ही हात जोडून नमस्कार केला. म्हणाले, ''आपण या भूमीचे देव आहात, भूदेव आहात, आपल्या मुखातून जी अक्षरं निघाली ती वाया जाणार नाहीत!'' मग ज्ञानेश्वरांनी त्या रेड्याच्या मस्तकावर आपला शुभंकर, लांबसडक निमुळत्या बोटांचा, कमळासारखा सुंदर आणि रेखीव हात ठेवला. आणि त्यांनी स्वत: ऋग्वेदातील ऋचा म्हणायला सुरुवात केली. आणि काय आश्चर्य! ज्ञानेश्वर जसजसे वेदघोष करीत होते तसतसा त्या रेड्यानेही वेदघोष करायला सुरुवात केली. अतिशय स्पष्ट आणि स्वच्छ वाणीत! शुद्ध उच्चार करून! इतके सुंदर की पट्टीच्या वेदपाठकांनीही खाली माना घातल्या. एखाद्या विद्वान पंडितासारखा तो रेडा एक प्रहरभर त्या पवित्र गोदातीरी वेदघोष करीत होता. ज्ञानेश्वरांचा शुभ, मंगल, वरदहस्त त्या भाग्यवान रेड्याच्या मस्तकावर पडला होता ना! मग काय! रेडा भराभर भराभर चारही वेदातील ऋचा म्हणू लागला आणि त्याने सभोवार जमलेल्या हजारो ब्राह्मणांना मंत्रमुग्ध करून टाकले. अशा ज्ञानी पुरुषाला आता शुद्धिपत्र तरी काय द्यायचे असा धर्मशास्त्रज्ञांना प्रश्न पडला. सर्व ब्राह्मणांना त्यांच्या योग्यतेची प्रचीती आली. स्वत:च्या गुणांनी, व्यक्तिमत्वाने जे स्वत:चेच ओळखपत्र बनले आहेत,. त्यांची कुणी ओळख करून देऊ शकेल का? असा पेच पैठणकर ब्राह्मणांना पडला. अखेर पं. बोपदेवांनी ज्ञानेश्वरांना शुद्धिपत्र दिले. त्यात त्यांनी म्हटले होते की, 'ज्ञानदेव निवृत्ति, सोपान व मुक्ताई यांसारख्या देवांना शुद्धिपत्र काय द्यायचे आणि त्याना प्रायश्चित्त तरी काय देणार?' अशा रीतीने शुद्धिपत्र घेऊन ज्ञानदेव आपल्या भावंडासह आपेगावी परतले.

## ''अगबाई! कोरा कागद!''

ज्ञानेश्वरांनी रेड्याकडून वेद वदविल्याची गोष्ट सर्वत्र पसरली. पैठणाहून यात्रा करणारा एक यात्रेकरू ब्राह्मण एकदा सहजच चांगदेव ऋषींच्या आश्रमात आला होता. चांगदेव शिवभक्त होते. श्रीशंकराच्या कृपेने त्यांना नाना विद्या, कला, ज्योतिष वगैरे गोष्टी साध्य झाला होत्या. चौदाशे वर्षे त्यांनी तप केले होते. साधना केली होती. कितीतरी जणांचे मनोरथ ते आपल्या तपोबलाने पूर्ण करीत. खानदेशात तापी नदीच्या तीरावर आपल्या सिद्धाश्रमात बसून ते येणाऱ्या यात्रेकरूंच्या इच्छा योगसिद्धीच्या शक्तीवर पुऱ्या करीत.

अशा या चांगदेवांना ज्ञानेश्वरांची गोष्ट कळताच त्यांना त्या भावंडांना भेटण्याची ओढ लागली. आता त्यांना भेटायचं ठरवल्यावर चांगदेव ज्ञानेश्वरांना पत्र लिहायला बसले. पण सुरुवात कशी लिहायची हेच त्यांना कळेना! कारण चांगदेव होते १४०० वर्षांचे नि ज्ञानदेव होते १४ वर्षांचे! त्या चौदा वर्षांच्या मुलाला 'तीर्थरूप' कसं लिहायचं बरं? कारण ते चांगदेवाचं महत्त्व कमी करणारं ठरेल! आणि ज्ञानदेव लहान आहेत म्हणून 'चिरंजीव' लिहिलं तर त्यामुळे एवढ्या मोठ्या योगीराजांचा - ज्ञानदेवांचा अपमान होईल. काय करावं मग? चांगदेवांना काहीच सुचेना. शेवटी त्यांनी काहीच न लिहितां कोरा कागदच पाठवायचं ठरवलं. चांगदेवांचे शिष्य तो कागद घेऊन ज्ञानदेवांकडे आळंदीला गेले. ज्ञानदेव मुक्ताईबरोबर गोष्टी करीत बसले होते. निवृत्तिनाथ, सोपानही त्यात दंग होते. चौघा भावांचा छान सुखसंवाद चालला होता. मुक्ताईने नुकताच खोपा बांधला होता केसांचा! तिला नीट वेणी घालतां येत नव्हती. दहा वर्षांची तर होती ती! मग ज्ञानेश्वर तिची आई झाले. त्यांनी लडिवाळपणे म्हटलं, ''मुक्ते, ये ग! मी

घालून देतो तुझी वेणी!'' मुक्ताई भावाजवळ आली. हातात फणी घेऊन ज्ञानदेव तिचे केस विंचरू लागले. तो मृदु, प्रेमळ स्पर्श मुक्ताईला अगदी संरक्षक वाटला. किती आधार वाटला तिला एकदम! ज्ञानियांच्या राजाचा स्पर्श होताच तसा प्रेमळ मनाला दिलासा देणारा! तिच्या मऊ काळ्याभोर केसांना न दुखवता ज्ञानदेव वेणी घालू लागले. निवृत्तीनाथ आणि सोपानदेव हे दृश्य डोळे भरून पाहात होते. ''ज्ञानदेवा, कशी रे येते तुला वेणी घालायला?'' मुक्ताईने विचारलं. ''मुक्ते, तुला तुझ्या या इवल्याशा हातांनी कसं ग रांधायला येतं आमच्यासाठी? तसंच! रोज तू माझी आई होतेस ना? आज मी तुझी आई झालो म्हणून आली तुझी वेणी घालायला!'' ज्ञानदेव म्हणाले. ज्ञानदेवांनी वेणी घातल्यावर मुक्ताईने ती वर खोचून तिचा 'खोपा' बांधला. कपाळावर कुंकवाची चंद्रकोर रेखली. चारीजणं अशी त्या साध्या मातीच्या घरात मजेने गप्पा करू लागली. त्या साध्या घराच्या भिंती प्रेमाच्या होत्या. भावंडांवरच्या प्रेमाच्या! छतसुद्धा प्रेमाचं होत! म्हणून तर त्या घरांत ऐश्वर्य होतं, आनंदाचं! वैभव होतं, बुद्धीचं! आणि संपत्ति होती समाधानाची! अशा त्या अलौकिक महालात चांगदेवाचे शिष्य आले. कोरा कागद पाहून ज्ञानेश्वरानं विचारलं, ''हे काय? चांगदेवांनी आमच्याकडे कोराच कागद पाठविला आहे?' तो प्रश्न ऐकून ते शिष्य चकित झाले. त्यांचं महत्त्व त्यांना पटलं. ज्ञानेश्वरांच्या चरणी मस्तक ठेवून त्या शिष्यांनी त्यांना नमस्कार केला. मुक्ताबाईने तो कोरा कागद पाहून खट्याळपणे म्हटल, ''अगबाई! चौदाशे वर्षे तप करून हा चांग्या कोराच्या कोराच राहिला आहे!'' तिचं बोलणं ऐकून तिघाही भावंडाना हसू आलं. मग निवृत्तिनाथांनी ज्ञानेश्वरांना म्हटलं, ''ज्ञानदेवा -''

"'काय गुरुवर्य?'' ज्ञानदेवांनी नम्रतेने विचारलं, ''ज्ञानेशा! हा चांगदेव स्वभावाने सुशील आहे. पण अहंकारी! सगळं काही ज्ञान आहे ते स्वत:लाच असा त्याचा भ्रम आहे. बाकी तो सद्गुणी आहे. त्याचा अहंकार दूर होण्यासाठी, त्याला ब्रह्मज्ञानाचे खरे स्वरूप कळण्यासाठी तू या पत्राला उत्तर लिही. असं सुंदर पत्र लिही माझ्या ज्ञानेशा, की, मनातला अहंकार नष्ट होऊन त्याचे सद्गुण आपलं मोहक, सुंदर रूप दाखवतील.''

## ''प्रिय चांगदेवा!''

निवृत्तिनाथांची आज्ञा मानून ज्ञानेश्वरांनी चांगदेवाला ६५ ओव्यांचं एक उद्बोधक पत्र लिहिलं. हे पत्र 'चांगदेवपासष्टी' या नावाने प्रसिद्ध आहे. या ओव्यांमधून ज्ञानेश्वराने जग आणि आत्मा कसे एक आहेत हे अतिशय समर्पक उपमा देऊन स्पष्ट केले आहे. ''जे मुळात आहे त्यात दोनपणा आलेलाच नाही, लाटांच्या रूपाने पाणीच असते, लाटा या नुसत्या भासमान होतात तसे जग हे विविधतेने भासमान होते, पण तो आत्माच आहे, द्रष्टा दृश्य व पाहाणे हे तेथे लयास जाते. ज्याप्रमाणे गूळ आणि गुळाची गोडी एकच आहे, सोनं आणि त्यापासून बनवलेले दागिने एकच आहेत, त्याप्रमाणे आत्मा या जगाच्या रूपाने प्रकट झाला आहे. म्हणून आत्मा आणि हे जग दोन्ही एकच आहे. म्हणजेच परमेश्वर, आणि त्याने निर्माण केलेले जग एकच आहे.' सर्वांमध्ये परमेश्वराचा अंश आहे, आणि परमेश्वरांत सगळ्यांचे मूळस्थान आहे. प्रिय चांगदेवा! तुझा आणि माझा एकपणाही मला ठाऊक आहे, तुला भेटू भेटू झालं आहे माझ्या चांगदेवा! पण तू नि मी वेगळे आहोतच कुठे? आपला आत्मा एक आहे, रूपं दोन आहेत!' ज्ञानेश्वरांनी अशा प्रकारे आपले आत्मबोधाचे विचार त्यांना कळवले.

## ''हे काय ? वाघावरून कोण आलं ?''

चांगदेवांना आत्मबोध वगैरे काही कळलंच नाही. म्हणून मग शेवटी त्यांनी ज्ञानेश्वरांना भेटायचं ठरवलं. आता एवढा मोठा ज्ञानी, सिद्धपुरुष चांगदेव ! ज्ञानोबांना भेटायला जाणार म्हणजे काहीतरी चमत्कार दाखवायलाच ! म्हणून मग त्या गर्विष्ठ अहंकारी चांगदेवानी काय केलं, तर सापाचा चाबूक घेतला. पिवळा जर्द, अक्राळविक्राळ, भयंकर वाघ हे त्यांनी आपले वाहन निवडलं. त्या वाघावर स्वार होऊन त्यांनी सर्पाचा चाबूक घेतला. वाघाचं रूप तरी कसं होतं ? अगदी भयानक ! त्याच्या अंगावर काळेभोर पट्टे होते, त्याचा जबडा अतिशय भीतीदायक होता, त्याची जीभ लालभडक आणि लळलळ करणारी होती आणि प्राण्यांची हाडं कडाकडा चावून खाणारे त्याचे दात अगदी मजबूत होते. अशा त्या





हिंस्त्र वाघावर चांगदेव अगदी सहज बसले होते. चांगदेवांची ती उग्र मूर्ति, त्यांच्या डोक्यावरच्या जटा, त्यांचे लालसर उग्र डोळे, गळ्यात रुद्राक्षांच्या माळा आणि एका हातात त्रिशूळ आणि दुसऱ्या हातात सापाचा चाबूक असं त्याचं रूप पाहून कुणालाही चळचळा कापायला झाले असते. वाघावर स्वार झालेले चांगदेव आपल्या १४०० शिष्यांचा समुदाय घेऊन आळंदीला आले. ते आल्याची बातमी द्यायला त्यांचे शिष्य ज्ञानेश्वरांकडे आले. त्यावेळी ज्ञानदेव आपल्या तिन्ही भावंडांबरोबर घराजवळच्या कुंपणाच्या भिंतीवर मजेत गप्पा मारीत, ऊन खात बसले होते.

## हं भिंतबाई ! चाल बघू !

ती चारही भावंडं भिंतीवर बसलेली असताना चांगदेवाचे शिष्य तिथे आले व म्हणाले, ''आमचे गुरुवर्य चांगदेवमहाराज आळंदीत

आले आहेत.'' ते ऐकून निवृत्तिनाथ म्हणाले, ''ज्ञानदेवा, बघ बाबा! चांगदेवासारखे थोर महापुरुष आपल्या भेटीसाठी आले आहेत.'' त्यावर ज्ञानदेवांनी नुसतीच हसून मान डोलवली. ''अरे, मग आपणही त्यांना सामोरं नको का जायला?'' निवृत्तिनाथांनी पुढे विचारलं. ''जशी आज्ञा.'' ज्ञानदेव म्हणाले. लगेच ज्ञानेश्वरांनी त्या निर्जीव भिंतीला म्हटलं, ''चल ग बये! चल बाई लवकर!'' आणि काय गंमत! ते ज्ञानदेवांचे शब्द ऐकून ती निर्जीव भिंत अगदी जिवंत प्राण्यासारखी भराभर भराभर चालायला लागली. भिंतीवर ते चार अलौकिक बालसंत शांतपणे बसले होते. समोरून वाघावर आरूढ झालेले चांगदेव येत आहेत आणि त्यांना भेटायला, त्यांचं स्वागत करायला ज्ञानदेव आपल्या भावंडांबरोबर भिंतीला चालवीत त्यांना सामोरे जात आहेत असा विलक्षण आश्चर्यकारक देखावा आळंदीतल्या लोकांनी पाहिला. चांगदेवांनी जेव्हा भिंतीवरून येणारी ही बालसंतमंडळी पाहिली, निर्जीव भिंतीला चालवीत आणणारे ज्ञानेश्वर पाहिले, तेव्हा त्यांचा गर्व नष्ट झाला, ते योगी होते पण अहंकारी होते. त्यांचा गर्व नाहीसा करायला ज्ञानदेवांनी ही युक्ती केली. कारण ज्ञानदेवांना माहीत होते की चांगदेवाना योगविद्येत जिंकल्याखेरीज त्यांचा अहंकार मावळणार नाही. आणि जिथे अहंकार आहे तिथे आत्मबोध कसा होणार? आत्मज्ञान कसं समजणार? चांगदेवांचा गर्व अशा रीतीने नष्ट झाल्यावर ते निर्मळ झाले. ज्ञानदेवांबद्दल त्यांना प्रेम आणि आदर वाटून त्यांच्या डोळ्यात अश्रू आले. त्यांचं ते पवित्र रूप पाहून भिंतीच्या पायाशी येऊन पडले होते, त्यांना प्रेमाने उठवीत ज्ञानदेव म्हणाले, ''चांगदेवा, ऊठ!'' ज्ञानदेवांचा मृदु, पवित्र, स्पर्श! चांगदेव नुसते धन्य धन्य झाले. मग ज्ञानेश्वरांनी त्यांच्या अंगावरून, डोळ्यांवरून आपला हात फिरवला. त्याबरोबर चांगदेवांच्या मनात

ज्ञानोदय झाला. ज्ञानेश्वरांनी म्हटलं, ''चांगदेवा, आता तुला पासष्टीचा अर्थ कळेल. मुक्ताई तुझी गुरू होईल. तुझ्या गुरुत्वाचा मान तिचा आहे.'' अशा प्रकारे चांगदेव मुक्ताईचे शिष्य झाले.

## ''मुक्ते! मांडे कर ना!''

एकदा ज्ञानेश्वरांना रात्री जेवता जेवता सहज मांडे खाण्याची इच्छा झाली. चौघंही भावंडं कोंडाळं करून जेवायला बसली होती. निवृत्तिनाथ मुक्ताईने केलेला स्वयंपाक मोठ्या चवीने खात होते. त्यावेळी ज्ञानेश्वरांना मांड्यांची आठवण झाली. ''मुक्ताई बऱ्यात दिवसात मांडे नाही खाल्ले! करशील?''

''हो रे ज्ञानदेवा! उद्याच करीन. तू काही असं करायला सांगितलंस ना, की किती आनंद होतो मला म्हणून सांगू!'' मुक्ताई त्याच्याकडे मायेने पहात म्हणाली. संन्याशाची पोरं म्हणून आळंदीतल्या लोकांना त्या मुलांचा राग येत होता. त्यामुळे ती भावंडं एकमेकांना फार जपत असत. निवृत्तिनाथ तर ज्ञानदेवांचे थोरले बंधु आणि गुरू होते. ज्ञानदेवाच्या पायात काटा मोडला तर त्याची वेदना निवृत्तिनाथांना होई. आपल्या भावंडांवर त्यांचं प्राणापलीकडे प्रेम होतं. ज्ञानदेवाची मांडे खाण्याची इच्छा ऐकून ते म्हणाले, ''ज्ञानेशा, एकदम मांडे खावेसे कां बरं वाटले?''

''वाटले, सहज! मुक्ताई सुगरण आहे. तिच्या हाताला अमृताची गोडी आहे.'' ज्ञानदेव बहिणीचं कौतुक करीत म्हणाले.

''तुझ्या अमृतवाणीपुढे माझ्या हाताची ती चव कसली रे ज्ञानदेवा?'' मुक्ताईच्या मनात ज्ञानेश्वराबद्दलचा अभिमान अगदी मावत नव्हता.

''किती सार्थ बोललीस ग मुक्ताई! पण दादा, मांडे करणं फार कौशल्याचं काम आहे. मुक्ताईच्या नाजुक हातांनी ती मांड्याचं पीठ

मळून दोन्ही हातावर अगदी पातळ मांडे बनवते! अगदी नाजूक! स्फटिकासारखे पारदर्शक! इतके पातळ की तोंडात टाकल्यावर विरघळून जातील! मुक्ते! बाळे, माझ्यासाठी मी तुला फार खटाटोप करायला सांगतो, हो ना?'' ज्ञानदेवाने विचारलं.

''ज्ञानदेवा, असं रे काय विचारतोस? उलट तू हक्काने माझ्याकडे तुझी आस बोलून दाखवतोस यातच मला आनंद मिळतो, तुझ्यासाठी पदार्थ बनवायला मला खरंच खूप आवडतं रे!'' मुक्ता कळवळून म्हणाली.

''पण मांडे भाजताना तुझे नाजुक हात भाजणार नाहीत ना? तुझ्या हाताचे तळवे फुलासारखे कोमल आहेत. वेडे, मांडे किती पातळ असतात, तुझे तळवे होरपळतील! फोड येतील! मुक्ते... '' ज्ञानदेव तिच्या काळजीने म्हणाले.

''ज्ञानदेवा, इतकं प्रेम नको करूस रे माझ्यावर! सोसत नाही माझ्याच्याने! अरे, चुलीकडे काम करायचं म्हणजे चटके सहन करायलाच हवेत. आणि माझ्या या चटक्यांचं मला काही वाटत नाही. पण.. पण.. मुक्ताई एकदम गप्प बसली.

''पण काय?'' निवृत्तिनाथाने विचारलं. ''पण अपमानाचे चटके सहन करता... शांतपणं! डोक्यावर उन्हाचे चटके, पायाखाली तापलेल्या धरणीचे चटके,... मनात अपमानाचे चटके...'' मुक्ताईचं बोलणं ऐकून कुणी काहीच बोललं नाही. शांतपणे जेवणं उरकली.

## दुष्ट आहेत हे लोक!

नेहमीप्रमाणे मुक्ताई पहाटेच उठून नित्य कामें करू लागली. दुपारी तिला एकदम मांडे करायची आठवण झाली. तिचे तिघे भाऊ भिक्षेसाठी बाहेर पडले होते. पण ज्ञानदेवानं तिला आठवण करीत

म्हटलं होतं, ''मुक्ताई, मांडे करून ठेव बरं का!'' मुक्ताईला हंसू आलं हे आठवून! काय बाई तरी कालपासून याला मांडे खावेसे वाटतात! पण मग एकाएकी तिच्या पोटात कालवाकालव झाली. वाटलं, आई असती तर याचे किती लाड झाले असते. आपण जे काही रांधून घालतो ते गोड मानून खातात, आईने यापेक्षा सुंदर स्वयंपाक रांधला असता, बाबांनी आम्हाला जवळ घेऊन जेवायला बसवलं असतं, घास भरवला असता प्रेमानं! मुक्ताईचे डोळे भरून आले, ते ज्ञानदेवाच्या प्रेमामुळे! त्याला चांगलंचुंगलं करून घालावं असं तिला नेहमी वाटायचं. आईची जागा थोड्याफार प्रमाणात भरून काढायची त्या चिमुरडीची धडपड असायची. आताही ती मांडे करायच्या तयारीला लागली. पण मांडे करायला लागणारं मातीचं भांडं काही घरात नव्हतं. ती हिरमुसली. आतां काय करायचं? मग तिला आठवलं, ज्ञानदेवाने तिला 'शेजारच्या कुंभाराकडून खापरं आण आणि मांडे कर' असं सकाळीच सुचवलं होतं. ती लगेच प्रसन्न मनाने शेजारी गेली. कुंभारदादाला म्हणाली,

''दादा, मांडे करायचे आहेत.''

''मग?'' त्यानं विचारलं.

''भांडं द्या मातीचं!'' तिने विनवलं. पण आळंदीत रहाणाऱ्या विसोबा चाटी या एका दुष्ट माणसाला संन्याशाच्या या पोरांवर अद्यापही भारी राग होता. त्या कर्मठ ब्राह्मणाने आपल्या ओळखीच्या सर्व कुटुंबांना ह्या भावंडांना कसल्याही प्रकारची मदत करू नये असे बजावले होते. त्यामुळे मुक्ताईनं मातीचं भांडं मागितल्यावर तो कुंभार म्हणाला, ''तुला? आणि भांडं देऊ? नाही! जा बघू घराकडे!'' बिचारी मुक्ता! चिमणीएवढं तोंड करून परत फिरली आणि दोन गुडघ्यात मान घालून बसली.

''बघतेस काय? ही बघ उघडी पाठ!

थोड्या वेळाने भिक्षा घेऊन निवृत्ती, ज्ञानदेव नि सोपान घरी आले. पाहतात तो काय! चुलीपुढे शुकशुकाट! मुक्ताई स्वस्थ बसलेली! ज्ञानदेवानं आश्चर्यानं विचारलं, ''का ग ताई, अशी कां बसलीस?''

मुक्ताई काहीच बोलली नाही. ज्ञानदेवानं तिच्या मस्तकावरून प्रेमानं हात फिरवला तशी मान वर करून मुक्ता उद्गारली,

''ज्ञानदेवा...'' पुढे तिला बोलवेना

''का ग? मांडे का केले नाहीस?'' ज्ञानदेवाने विचारलं.

''कशावर करू मांडे?'' मुक्ताईने दीनवाण्या स्वरात त्याला प्रश्न केला.

''म्हणजे? शेजारच्या कुंभाराकडून भांडं नाही आणलंस?'' ज्ञानेश्वरांनी विचारले.

''त्यांनी दिलं तर आणलं असतं ना! ज्ञानदेवा... ज्ञानेश्वरा... माझ्यावर पुन्हा असा शेजारीपाजारी भीक मागण्याचा प्रसंग नको रे आणूस! मला सगळ्यांची बोलणी खावी लागतात!'' बोलता बोलता मुक्ताई रडायला लागली, तिचं बोलणं ऐकून ज्ञानदेवांना संताप आला. लोकांच्या अवहेलनेची चीड आली. त्यांचे डोळे लाल झाले. आतून ठिणग्या बाहेर पडतील की काय असं वाटलं. त्यांनी मुक्ताईला म्हटलं, ''ऊठ ताई! रडू नकोस, डोळे पूस आधी! घे ते पीठ!''

''पण मग मांडे भाजू कशावर मी?'' मुक्ताईने डोळे पुसत विचारलं.

''माझ्या पाठीवर?'' तिच्यापुढे हात नि गुडघे टेकून ओणवं होत ज्ञानेश्वरानं सांगितले. आपल्या तेजस्वी भावाच्या

योगसामर्थ्यावर मुक्ताईचा पूर्ण विश्वास होता. ज्ञानेश्वरांनी आपला जठराग्नि प्रज्वलित केला. त्यांच्या तापलेल्या पाठीवर मुक्ताईने व्यवस्थितपणे मांडे भाजले. डोळे लालभडक झालेले, तोंडातून आगीच्या ज्वाला आणि रसरसून तापलेली पाठ अशी ज्ञानेश्वरांची अवस्था झाली होती. गंमत म्हणजे मुक्ताईची फजिती करायला निघालेल्या विसोबा चाटींचीच फजिती झाली होती. विसोबा दाराआड उभे राहून मुक्ताईची मजा बघायला टपले होते, पण त्यांना ज्ञानदेवांचे अलौकिक योगसामर्थ्य नजरेस पडले. ते पाहून विसोबा मनातून शरमले. ते ज्ञानेश्वरांना शरण गेले. ज्ञानेश्वरांच्या ताटातील त्यांनी टाकलेलं उष्टं अन्न विसोबा खाऊ लागले. ते पाहून ज्ञानदेवांनी विचारलं, ''हे काय? खेचरासारखं उष्ट खरकटं कां बरं खात आहात?''

''असं का म्हणता? अहो ते उष्ट अन्न असलं तरी संतांचं आहे,'' विसोबा नम्रपणे आणि भक्तिभावाने उत्तरले. त्या दिवसापासून लोक त्यांना विसोबा खेचर म्हणू लागले.

## ''बाळा! मायबोलीचं ऋण फेड!''

नेवासे या गावी ज्ञानेश्वर आपल्या भावंडांसह राहात असतानाची गोष्ट! एकदा सकाळी स्नानसंध्या आटोपून ते शंकराच्या देवळात चिंतन करीत बसले होते. तोच निवृत्तिनाथ तिथे आले. ज्ञानेश्वरांच्या तेजस्वी मुखाकडे त्यांनी कौतुकाने पाहिले. ज्ञानदेवासारखा 'ज्ञानी' पाठचा भाऊ म्हणून लाभला, शिष्य म्हणून लागला, याचा त्यांना अभिमान वाटत होता. ते ज्ञानेश्वरांजवळ गेले. पद्मासन घालून ज्ञानदेव परमेश्वराचे ध्यान करण्यात मग्न झाले होते. त्यांच्या रेशमी केसावरून आपला पवित्र हात फिरवीत निवृत्तिनाथ प्रेमाने उद्गारले,

''ज्ञानेशा! बाळा!'' त्यांचा स्वर ऐकून ज्ञानदेवांनी आपले कमलनेत्र उघडले. मंद हसून ते म्हणाले,

''गुरुवर्य...''

''बाळा! एक मनातलं बोलावसं वाटतं रे!'' निवृत्तिनाथ त्यांचा हात हातात घेत त्यांच्याजवळ बसत म्हणाले. देवळातल्या पवित्र, शांत वातावरणात आपलं मन मोकळं करावं असं निवृत्तिनाथांना वाटत होतं.

''दादा! बोल ना!'' निवृत्तिनाथांचा हात घट्ट दाबीत ज्ञानदेव म्हणाले.

''ज्ञानदेवा, परमेश्वराच्या भक्तीचा, नामस्मरणाचा मार्ग साऱ्या लोकांना खुला व्हावा असं मला वाटतं. खेडोपाडी सर्व ठिकाणी भक्तिमार्गाचे शिक्षण दिले पाहिजे असं वाटतं रे मला! सामान्य माणसांना संसारातल्या अडचणींना तोंड देण्याची शक्ती येण्यासाठी, आपलं कर्तव्य त्यांना दाखवून देण्यासाठी, परमेश्वराची भक्ति कशी करावी याचे ज्ञान देण्यासाठी हे ज्ञानदेवा, तू संस्कृतमध्ये असलेली भगवद्‌गीता मायबोलीत आण! मराठी भाषेत लिही! मग बघ, आज मूठभर विद्वानांची मक्तेदारी असलेली गीता तुझ्या ओव्यांच्या रूपाने अवघ्या बहुजनसामाजाच्या ओठावर खेळू लागेल, त्यांना जाग येईल, ज्ञान मिळेल! ज्ञानेशा, ज्ञानियांच्या राजा, चल, ऊठ. या शंकराच्या देवळात बसून गीतेचा मराठीत भावार्थ सांग!'' निवृत्तिनाथ संथ स्वरात सांगत होते.

''गुरुवर्य! जशी आपली आज्ञा! आपल्या प्रेरणेनें, आशीर्वादाने मला यश मिळेल अशी मी आशा करतो.'' निवृत्तिनाथांना नमस्कार करीत ज्ञानदेव म्हणाले.

''पण दादा, हे लेखन करणार तरी कोण?'' त्यांनी विचारले.

''ज्ञानेशा, तुझ्या मुखातून बाहेर पडणाऱ्या अमृतवाणीचे लेखन करण्यासाठी सच्चिदानंदबाबा आहेत! आठवतं? नेवाशाला येताक्षणीच तुला एक पतिव्रता स्त्री रडताना दिसली होती...'' निवृत्तिनाथ म्हणाले.

''हो! दादा! आठवलं! आपल्या मेलेल्या नवऱ्याच्या प्रेताजवळ शोक करीत ती स्त्री जोरजोरात आक्रोश करीत होती.'' ज्ञानदेव म्हणाले.

''तू तिथे गेलास आणि विचारलंस, या मेलेल्या माणसाचं नाव तरी काय आहे? तेव्हा त्याचं नाव सच्चिदानंदबाबा असल्याचं कळलं. तू एकदम म्हणालास, छे! छे! असं कसं होईल? सत् चित् आणि आनंद या गोष्टींना मृत्यू स्पर्शच करू शकत नाही. आणि असं म्हणत तू त्या प्रेताच्या अंगावरून हात फिरवलास. तो मृत पुरुष लगेच जिवंत झाला. उठून उभा राहिला. आणि तुला अत्यानंदाने त्याने नमस्कार केला. ज्ञानदेवा, त्या सच्चिदानंदबाबांकडून तू लेखन करून घे.'' निवृत्तिनाथ म्हणाले.

''जशी आज्ञा!'' दोन्ही हात जोडून त्यांना नमस्कार करीत ज्ञानदेव म्हणाले. त्यांनी सच्चिदानंदबाबांना बोलावून घेतले.

''नमस्कार ज्ञानेश्वरमहाराज, आपण मला कशासाठी बोलावून घेतलत?'' त्यांच्या चरणी आपला माथा ठेवीत सच्चिदानंदबाबांनी विचारलं.

''माझ्या गुरूंच्या आज्ञेवरून मला 'गीता' मराठीत लिहावयाची आहे. तुम्ही माझे लेखनिक व्हावं अशी आमची इच्छा आहे.'' ज्ञानदेव उत्तरले.

''महाराज, यापेक्षा माझं दुसरं भाग्य ते कोणतं? मी आपल्या सेवेसाठी तत्पर आहे.'' सच्चिदानंदबाबा नम्रतेने म्हणाले.

''हं लिहा, सच्चिदानंदबाबा लिहा.''

त्यानंतर ज्ञानदेव निवृत्तिनाथांजवळ बसले. समोर लेखणी घेऊन सच्चिदानंदबाबा बसले. समईमधील मंद ज्योत वातावरण प्रसन्न करीत होती. निवृत्तिनाथांना मग ज्ञानेश्वरांनी भक्तिभावाने नमस्कार केला. अशा रीतीने देवळातील पवित्र वातावरणात अतिशय मृदु आणि मोहक आवाजात, कोमल शब्दांत श्री ज्ञानेश्वर महाराज गीतेचा अर्थ मराठीत सांगू लागले. शेजारीच निवृत्तिनाथ आपल्या लाडक्या भावाचे, शिष्याचे हे कौतुक दोन्ही डोळ्यांनी अगदी तळमळीने पाहात होते. ज्ञानेश्वरांच्या तेजस्वी मुखावर मनोहर हास्य उमटले होते. डोळे विलक्षण बुद्धिवान आणि सुंदर दिसत होते. कपाळावर रेखलेले गंध जास्तच पवित्र वाटत होते. निवृत्तिनाथांना वाटलं, आपल्या या ज्ञानी भावाला अगदी कडकडून मिठी मारावी. त्याच्या गालांवरून हात फिरवीत म्हणावं, ''बाळा, अरे सोळाव्या वर्षी एवढं ज्ञान कसं मिळालं तुला? माझ्या ज्ञानदेवा, अरे कुठल्या जन्मीचं पुण्य होतं म्हणून तू माझा पाठचा भाऊ झालास! पाठचा खरा, पण कधी कधी थोरला वाटतोस रे!'' पण ते ज्ञानदेवांकडे नुसतेच पाहात बसले. ज्ञानेश्वरीच्या ग्रंथाचे लेखन असे पवित्र हाताने, पवित्र वाणीने आणि पवित्र श्रोत्यांच्या साक्षीने होत होते.

ज्ञानदेवांनी सुरुवात केली, 'ज्ञानेश्वरी' ग्रंथाची सुरुवात केली, ते म्हणाले,

''ॐ नमोजी आद्या। वेदप्रतिपाद्या।।
जयजय स्वसंवेद्या। आत्मरूपा।।''

त्यांनी सांगितलेली ही पहिलीच ओवी ऐकून निवृत्तिनाथ अगदी भारावून गेले. म्हणाले, ''धन्य तुझी ज्ञानदेवा! तुझी रसाळ वाणी अशीच अखंडपणे माझे कान तृप्त करू दे! बाळा, अरे तुझी स्तुति गायलाही माझ्याकडे शब्द नाहीत!''

ज्ञानदेवांनी विनम्रपणे त्यांना प्रणाम केला. ते म्हणाले, ''गुरुवर्य! ही तर आपलीच कृपा! आपल्याच मनातले शब्द तर माझ्या ओठावर येत आहेत. मी केवळ निमित्त!'' आपल्या भावाचे आपल्यावर असलेले प्रेम आणि निष्ठा पाहून निवृत्तिनाथांच्या डोळ्यांत पाणी आले. ते म्हणाले, ''माझ्या ज्ञानियांच्या राजा, बोल, तुझी अमृतवाणी मला ऐकू दे!'' तेव्हा ज्ञानदेवांनी पुन्हा गीतेचा अर्थ सांगायला सुरुवात केली. एकापाठोपाठ एक सुंदर, उपमा-उत्प्रेक्षांचे अलंकार लेवून त्यांच्या मुखातून रसाळ ओव्या उत्स्फूर्तपणे उमटत होत्या, आणि मोत्यासारख्या सुरेख अक्षरात सच्चिदानंदबाबा त्या लिहीत होते. ज्ञानेश्वरमहाराज म्हणाले,

हे असो दिठी जयावरी झळके १
कीं हा पद्मकर माथा पारुखे।
तो जीव चि पदी तुके। महेशाशी।। ९ ।।

खरंच! गुरुकृपेशिवाय यश कसे मिळणार? म्हणूनच ज्या शिष्यांवर गुरूची कृपादृष्टि होते, ज्यांच्या मस्तकावर श्रीगुरूंचा वरदहस्त पडतो तो 'जीव' असला तरी प्रत्यक्ष 'शिवाशी' समरस होतो, निवृत्तिनाथ ज्ञानदेवांचे ते अत्यंत नम्र बोलणे आणि त्यांच्या ठिकाणी म्हणजे गुरूंच्या ठिकाणी ज्ञानदेवांना असलेला अपार आदर पाहून अगदी गहिवरून आले. निवृत्तिनाथ त्यांना म्हणाले, ''ज्ञानदेवा, अरे माझी स्तुति तरी किती करशील? तू सांगितलं नाहीस तरीही मला कळतं रे सारं! चल, पुढे चल बघू!'' मग त्यांना वंदन करून ज्ञानदेवांनी पुढचा श्लोक वाचायला सुरुवात केली.

## काय सांगते ज्ञानेश्वरी ?

अशा रीतीने ज्ञानेश्वरी ग्रंथाचे लेखन चालू होते. यात ज्ञानेश्वरांनी सांगितले की प्रत्येकाने स्वधर्म पाळला पाहिजे. आपले नेमून दिलेले काम मन लावून केलं पाहिजे, आपलं कर्तव्य व्यवस्थित पार पाडलं पाहिजे. आयुष्यात न आवडणाऱ्या अप्रिय गोष्टीस कर्तव्य म्हणून तोंड द्यावं लागतं तेव्हा मोहग्रस्त होऊन कर्तव्यापासून पळून जाऊ नये, तर ते तडीस न्यावं, त्यातच खरा पुरुषार्थ आहे, संकटांना तोंड देण्यातच खरा धर्म आहे, पळपुटेपणा कधीही पत्करू नये, त्यात कसला अर्थ ? हिंमत धरून आपली सत्कर्मे करीत राहाणं हेच खरे जीवन आहे. दुसऱ्यांबद्दल मनात आदर, प्रेम ठेवून उत्कृष्ट जीवन जगण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

ज्ञानेश्वर महाराज प्रसन्न चित्ताने सांगत होते आणि निवृत्तिनाथ डोलत होते, ते म्हणाले,

''ज्ञानदेवा, बाळा, कुठे शिकलास इतकं सोपं तत्त्वज्ञान ? खरंच, सामान्य माणसाला, समाजाला तुझा हा ग्रंथ, मराठी भाषेला कळसावर पोचवणारी तुझी ही ज्ञानेश्वरी सदैव मार्गदर्शक ठरेल. ती काळावरही मात करील. अर्जुनाप्रमाणे स्वानंदराज्यभोग कसा भोगावा याची गुरुकिल्लीच तू लोकांना दिली आहेस ! ज्ञानेशा, तुझी ही भावार्थदीपिका म्हणजे आपल्या मराठीचा, मायबोलीचा केवढा मोठा सन्मान आहे ! मराठीमाऊलीचं ऋण तू फेडलंस ! ज्ञानदेवा... बोल ! तुझे लडिवाळ, गोड बोल पुन्हा पुन्हा ऐकावेसे वाटतात !'' निवृत्तिनाथांचे ते अंत:करणापासून उमटलेले बोलणे ऐकून ज्ञानेश्वरांना आनंद झाला. त्यांच्या मुखातून अतिशय हळुवार, मधुर ओव्या बाहेर पडू लागल्या.

## पसायदान

बघता बघता गीतेतील शेवटचा अध्याय सुरू झाला. अठरावा अध्याय! आणि ज्ञानियांच्या राजाने त्यावर उत्स्फूर्तपणे बोलायला सुरुवात केली. शेवटी ज्ञानदेवांनी परमेश्वराकडे मागणी केली स्वत:साठी नव्हे, तर लोकांसाठी! विश्वातील लोकांसाठी प्रार्थना केली. ते सांगू लागले.

आता विश्वात्मकें देवें! येणें वाग्यज्ञें तोषावें।
तोषोनि मज द्यावें। पसायदान हें।। १ ।।
जे खळांची व्यंकटी सांडो। तयां सत्कर्मी रति वाढो।
भूतां परस्परें जडो। मैत्र जीवांचे।। २ ।।
दुरितांचे तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो।
जो जे वांछील तो तें लाहो। प्राणिजात।। ३ ।।
वर्षत सकळमंगळीं। ईश्वरनिष्ठांची मांदियाळी।
अनवरत भूतळीं। भेटो तयां भूतां।। ४ ।।
चलां कल्पतरूंचे आरव। चेतना चिंतामणींचे गांव।
बोलते जे अर्णव। पीयूषाचे।। ५ ।।
चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन।
ते सर्वांही सदा सज्जन। सोयरे होतु।। ६ ।।
किंबहुना सर्वसुखीं। पूर्ण होऊनि तिहीं लोकीं।
भजिजो आदिपुरुषीं। अखंडित।। ७ ।।

ज्ञानेश्वर महाराज धीरगंभीर आवाजात ओव्या म्हणत होते. एकेक ओवी म्हणजे मूल्यवान रत्नासारखी होती. निवृत्तिनाथांचे तर आता भान हरपून गेले. ज्ञानेश्वरांनी शेवटची ओवी म्हटली आणि निवृत्तिनाथ व्याकुळ स्वरात म्हणाले, ''ज्ञानेशा, बाळा, ये रे! जवळ ये! मला भेटू दे तुला कडकडून! आता नाही राहवत रे!

''असं म्हणून त्यांनी ज्ञानदेवांना प्रेमाने मिठी मारली. दोघांच्याही डोळ्यातून अश्रू वाहू लागले. एकमेकांकडे ते नुसते पाहात राहिले. शब्द स्पर्श झाले, मग बोलण्यासारखं ते काय उरलं होतं? इतका वेळ मधुर भाषण ज्या कोवळ्या, गुलाबाच्या फुलाच्या पाकळीसारख्या नाजुक ओठातून चांदणं झिरपावं तसं झिरपत होतं त्या ओठांकडे, ज्ञानेश्वरांच्या अश्रुभरल्या डोळ्यांकडे पाहात निवृत्तिनाथ म्हणाले, ''बाळा,... ज्ञानेशा..'' पण पुढे त्यांना बोलवेना.

''मला कळतं रे दादा! सारं कळतं! तू आणि मी वेगळे थोडेच आहोत?'' निवृत्तिनाथांचा हात धरीत ज्ञानदेव म्हणाले. ते बोलणं ऐकून निवृत्तिनाथांना धन्य झालं. डोळ्यांनीच त्यांनी ज्ञानदेवांची दृष्ट काढली. सच्चिदानंदबाबा हा गुरुशिष्याचा, भावाभावाचा प्रेमसोहळा पाहात होते. ज्ञानदेव त्यांच्याकडे वळले. ज्ञानेश्वरीचे लेखन केलेला त्यांचा पवित्र, सुंदर हात त्यांनी आपल्या हातात घेतला आणि ते म्हणाले, ''सच्चिदानंदबाबा, किती कष्ट घेतलेत हो आमच्यासाठी!''

''महाराज! साता जन्मांची पुण्याई म्हणून तुमची सेवा करायला मिळाली!''

सच्चिदानंदबाबा उद्‌गारले आणि त्यांनी लेखणी खाली ठेवली. ज्ञानदेवाला जवळ घेऊन निवृत्तिनाथ कितीतरी वेळ ज्ञानेश्वरीवरून मायेने हात फिरवीत राहिले.

## ''चला पंढरपुरी जाऊ!''

निवृत्तिनाथांच्या उपस्थितीत ज्ञानदेवांनी 'ज्ञानेश्वरी' रचली. त्यानंतर त्यांना पंढरपुरी जाण्याची ओढ लागली. ''गुरुवर्य, वाटतं नामदेवांना भेटावं! पाहावं! अगदी कासावीस झाला आहे माझा

जीव नामदेवासाठी! पंढरपुरी जाऊन पांडुरंगाला डोळे भरून पाहावं! ते म्हणाले.

''ज्ञानदेवा... तुला असं एकदम काय झालं आहे रे?'' निवृत्तिनाथांनी त्यांच्या पाठीवरून मायेने हात फिरवीत विचारलं. पण ज्ञानदेव काही बोलले नाहीत. निवृत्तिनाथांना ज्ञानदेवांचं मन कळलं. भक्तिमार्गाचा प्रसार करण्यासाठी, अंधश्रद्धा दूर करण्यासाठी, नामस्मरणाचं महत्त्व सर्वांना पटवण्यासाठी तीर्थयात्रा करणे आवश्यक होते. म्हणून ज्ञानदेव आणि त्यांची भावंडं तीर्थयात्रेला निघाली.

ज्ञानदेव आपल्या भावंडांबरोबर पंढरपुरी येणार आहेत ही बातमी नामदेवांना आणि संत जनाबाईला कळली. नामदेव तिला म्हणाले, ''जनाई, आळंदीहून ज्ञानेश्वरमहाराज आपल्या भेटीसाठी यायला निघालेत ग!''

''अग बाई! मग घर झाडून ठेवते, काहीतरी चांगलंचुंगलं खायला करते. माझ्या ज्ञानराजासाठी!'' जनाबाईच्या स्वरात लगबग होती. तिची धावपळ पाहून हसून नामदेव म्हणाले, ''सावकाश बरं जनाई! अग किती राबतेस माझ्या घरी!''

''भाग्यानेच असं घर मिळतं नामदेवा राबण्यासाठी!'' जनाईच्या डोळ्यात नामदेवावरच्या भक्तीने आणि प्रेमाने पाणी आलं. नामदेव आपल्या पत्नीला म्हणाले, ''राजाई, आपलं भाग्य म्हणून ज्ञानदेवमहाराजांचे पाय आपल्या घराला लागणार बरं! डोळे भरून पाहायचं ग मला त्यांना!'' नामदेवांचा स्वर एकदम हळुवार झाला. दिवाळीचा सण आल्यावर जसं घर सुशोभित करतात तसं जनाबाईने राजाईच्या मदतीने सारं घर साफ केलं, अंगणात रांगोळी काढली, पणत्या लावल्या, झेंडूच्या फुलांच्या माळा दारावर लावून घर सुशोभित केलं. आंब्याची डहाळी दारावर

लावली आणि तुळशीवृंदावनाजवळही छान, सुबक रांगोळी रेखली.

## ''नामदेवा! कडकडून भेटू दे तुला.''

शेवटी ज्याच्या दर्शनासाठी नामदेवाचा आणि जनीचाही जीव तळमळत होता ते ज्ञानेश्वरमहाराज पंढरीत आले. नामदेवांनी प्रेमाने त्यांना मिठी मारली. जीव जीवत्वाला भेटला. त्यांच्या डोळ्यातून आनंदाचे अश्रू वाहू लागले. जनाईला ते दृश्य पाहून जन्माचं सार्थक झाल्यासारखं वाटलं. जनाईच्या आणि राजाईच्या हातचं रुचकर जेवण जेवून ज्ञानदेव तृप्त झाले. त्यांच्या भावंडानाही खूप समाधान लाभलं. ज्ञानदेव म्हणाले,

''नामदेवा, आता माझ्याबरोबर यात्रेला चल.'' पण नामदेवाचा जीव अडकला होता विठोबारायात! त्याची परवानगी घ्यायला मग ते दोघेही पंढरपुरीच्या पांडुरंगाला भेटले. तेव्हा पांडुरंग म्हणाले, ''नामदेवा, ज्ञानदेवांची संगत तुला भाग्यानेच मिळाली आहे. तेव्हा खुशाल त्यांच्याबरोबर जा.'' आणि मग ज्ञानेश्वरांच्या हाती नामदेवांना सोपवून पांडुरंग आपल्या देवळात परत गेले. ज्ञानेश्वर, त्यांची भावंडे, नामदेव व इतर शिष्य तीर्थयात्रा करीत निघाले. मंगळवेढ्याहून चोखोबा (चोखामेळा) आणि आरणभेंडीहून सावंतामाळी हेहि त्यांना पंढरीस येऊन मिळाले. यात्रा करीत करीत मंडळी तेरगांवी आली. तिथे संत गोरा कुंभार राहात होता. नामदेवांचे सवंगडी सर्व जाती जमातीचे होते. त्यांनी बहुजनसमाजाला प्रेमाने जिंकून घेतले होते. सर्व संतमंडळी एकमेकांना कडकडून भेटली. ज्ञानेश्वरांच्या डोळ्यात आनंदाश्रू आले. गोरोबाचा निरोप घेऊन मग सर्व संत मंडळी हळूहळू मार्ग काढीत काशीला पोचली. तिथे एका यज्ञप्रसंगात अग्रपूजेचा मान

ज्ञानेश्वर माऊलींना अगदी अनपेक्षितपणे मिळाला. त्यांना अशा मानाची काय किंमत होती म्हणा! पण काशीतल्या लोकांच्या भाग्याने त्यांना ज्ञानेश्वरांचे दर्शन झाले. काशीक्षेत्र त्यांच्या पावलांनी पवित्र झाले. अशा प्रकारे सर्वांना पोट भरून भेटून, भक्तिमार्गाचा प्रचार करीत आणि भजनात, नामस्मरणात आनंद उपभोगीत ज्ञानदेव सर्वांबरोबर तीर्थयात्रा आटोपून पंढरीस परतले. तिथून मग ज्ञानेश्वर आपल्या भावंडांबरोबर आळंदीला गेले.

## दादा! निरोप दे!

ज्ञानेश्वर आळंदीला आले खरे पण निवृत्तिनाथांना त्यांना काहीतरी सांगायचं आहे हे कळलं. सोपान, मुक्ताई बाहेर कुठेतरी गेली असतांना निवृत्तिनाथ म्हणाले, ''ज्ञानदेवा, तीर्थयात्रा मनासारखी झाली ना?'' ''होय गुरुवर्य! आता वाटतं की.. की.. संजीवन समाधि घ्यावी! माझं कार्य संपलं आहे...''

ज्ञानदेव म्हणाले,

''हे काय बोलतोस तू? अरे मी तुझा थोरला भाऊ! माझ्या आधी तू हे जग सोडणार? नाही रे ज्ञानेशा! तुझ्याविना मला जगता येणार नाही!'' निवृत्तिनाथ तळमळीने म्हणाले. ज्ञानेश्वर असं काहीतरी सांगणार याची त्यांना तीर्थयात्रेपूर्वी कल्पना होतीच. हजारो लोकांचं प्रेम लाभलेले, भक्ति लाभलेले ज्ञानेश्वर अवघ्या २१ व्या वर्षी हे जग सोडायची इच्छा दर्शवीत होते. निवृत्तिनाथ म्हणाले, ''ज्ञानेशा, पंढरीला जाऊ नि मग पाहू काय ते!'' त्याप्रमाणे सर्व पंढरीपुरी जमले. तेव्हा आळंदीहून निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपान, चांगदेव व मुक्ताई पंढरीस गेली.

चंद्रभागेत स्नान करून ज्ञानदेव विठ्ठलाला भेटले. म्हणाले, ''पांडुरंगा, आता अवतारकार्य संपलं माझं! समाधि घ्यायची

इच्छा आहे.'' त्यांचं बोलणं ऐकून नामदेवांना रडू फुटलं. पांडुरंग म्हणाले, ''ज्ञानदेवा! तू तर प्रत्यक्ष ज्ञान! तुझी इच्छा पूर्ण होईल!'' असं म्हणून त्यांना जवळ घेऊन त्यांचे लाड केले. रुक्मिणीदेवीने त्रयोदशीला स्वत: जेवण बनवून ज्ञानदेवांना पाटावर बसवून पोटभर जेवूं घातले. पंचपक्वानांचा घास प्रत्यक्ष रुक्मिणीमातेच्या हस्तस्पर्शानं कसा अमृताचा झाला. पांडुरंगानी ज्ञानदेवांना वर देत म्हटले, ''हे ज्ञानियांच्या राजा! तू थोर आहेस! म्हणूनच कार्तिक शुद्ध एकादशीला पंढरीला जसा महोत्सव होतो तसा कार्तिक वद्य एकादशीला तुझ्यासाठी आळंदीला मोठा उत्सव होत राहील.'' ज्ञानदेवांना आपले आनंदाश्रू आवरेनात. पांडुरंगाने त्यांना पोटाशी घेतले आणि त्यांच्या पाठीवरून मायेने हात फिरवला.

## आजि सोनियाचा दिन

पांडुरंगांची परवानगी घेऊन सर्वजण आळंदीला आल्यावर ज्ञानेश्वरांनी समाधि घेण्याचे ठरविले. इंद्रायणी नदीत स्नान करून त्यांनी विठोबाच्या चरणी मस्तक ठेवले. नंतर सोपानाचे लाड केले.
आम्हा मातापिता नित्य ज्ञानेश्वर। नाही आता थार विश्रांतीला।।
असं म्हणून मुक्ताईने आक्रोश केला. निवृत्तिनाथाने तिची समजूत घातली. ते म्हणाले, ''मुक्ताई, रडू नकोस! अग मला बघ किती वाईट वाटतं ते! माझ्यापेक्षा ज्ञानदेव लहान आहे, तो माझा भाऊ आहे, मुलगा आहे, शिष्य आहे! किती गुणी! किती नम्र! आणि किती ज्ञानी! माझ्या बाळा, अरे इतक्या कोवळ्या वयात तू जग सोडायला का निघालास राजा?'' पण मुक्ताईची समजूत घालता घालता आता निवृत्तिनाथांचेच डोळे भरून वाहू लागले. ज्ञानदेव तर नामदेवांचा जणू प्राणच! किती निरपेक्ष प्रेम होतं त्या दोघांचं एकमेकांवर! नामदेवाची विठ्ठलावरची काळजापासून असलेली

भक्ति पाहून तर ज्ञानदेव नामदेवांच्या प्रेमात पडले होते. त्यांच्या सहवासासाठी नुसते आसुसले होते. आणि ज्ञानदेवांच्या अलौकिक आध्यात्मिक सामर्थ्याने नामदेव दिपून गेले होते. भक्ति आणि ज्ञान एकमेकांसाठी नुसते तळमळत होते. नामदेवाचे भावमधुर बोलणे ऐकताना ज्ञानदेव देहभान विसरून गेले होते आणि ज्ञानदेवांचे रूप आपल्या दोन डोळ्यात साठवताना नामदेवांना वाटत होते की अवघ्या कायेनेच आता लोचन बनून या लाडक्या ज्ञानदेवाला पाहात बसावे! ज्ञानदेव समाधी घेणार या नुसत्या विचारानेच नामदेवांना रडू फुटले. आळंदीच्या इंद्रायणी नदीच्या काठावर ज्ञानेश्वरांवर प्रेम करणारी, भक्ती करणारी हजारो मंडळी त्यांना निरोप द्यायला जमली होती. त्या सर्वांना आपापले कर्तव्य करताना, संसार करताना ज्ञानदेवांनी पांडुरंगाची भक्ति करण्याचा मार्ग दाखवला होता. पांडुरंगाशी संवाद साधण्याची किमया शिकवली होती. ते ज्ञानदेव आता आपल्याला सोडून जाणार म्हणून सर्वजण अगदी कासावीस झाले होते. अखेर सर्वांचा निरोप घेऊन इंद्रायणीकाठी अजानवृक्षाच्या छायेखाली असलेल्या गुहेच्या समाधिस्थानाकडे ते गेले. त्या २१ वर्षांच्या महापुरुषाने जराही विचलित न होता, निर्विकारपणे संजीवन समाधी घेऊन आपला अवतार संपवला. तरीही जोपर्यंत या विशाल भारतात गंगा नदी वाहात आहे तोपर्यंत ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरीरूपी काव्यगंगा अशीच रसाळपणे वाहणार, जोपर्यंत दैदीप्यमान सूर्य आकाशात तळपत आहे तोपर्यंत ज्ञानेश्वरीचा ज्ञानसूर्य आपल्या बुद्धितेजाने सर्वांना शहाणे करून सोडणार, आणि जोपर्यंत मूर्तिमंत लावण्य असलेला चंद्र आकाशात प्रकाशमान होत आहे तोपर्यंत आपल्या ज्ञानेश्वरीच्या कोमल, शुभ स्पर्शाने ज्ञानदेव सर्वांवर प्रेमाच्या चांदण्याची बरसात करीत राहाणार!

